

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका







# दीपावली

गणराज्य-दिन नौदल दर्शन-विशेषांक



वर्ष २२ वे • फेब्रुवारी १९६७ • मूल्य १॥ रु.

## श्रेयनामावलि–



दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

Gram : Dalalart

टे. नं. ३५७७६५

• संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. **या प्रतीस किंमत** १॥ रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकास रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं. प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.

Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57

**DIPAVALI ; Dalal Art Studio, 40–42, Kennedy Bridge, Bombay –4.**



अनुक्रमणिका





**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४,
टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रवार्षिक वर्गणी रु.२५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी–जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.




# अर्घ्य....

सा-ग-र या तीन अक्षरांत विश्वाचा आदि, मध्य आणि अन्त समाविष्ट आहेत. सागर प्रलयातून तरलेल्या मनूनेच 'स्मृति' दिली. त्याच सागराला आपल्या क्रोधाने एकाच घोटात स्वाहा करणारे अगस्ती ऋषी अजरामर झाले.

'सागरा प्राण तळमळला' ही स्वातंत्र्यवीराची कविता त्यांना रत्नाकरामुळेच स्फुरली. 'घरधनी गेला दरियापार' हे भावगीतही विरही प्रेयसीने आळविले त्यालाही कारण तोच. मत्स्यगंधेच्या मानसकन्या 'नाखवा वल्हव वल्हव' हे प्रेमार्त सूर त्याच्याचमुळे गुणगुणतात. आणि–आजही पोर्तुगीजांच्या तुरुंगात खितपत पडलेले कांही झुंजार भारतीय स्वातंत्र्यवीर मनोमनी सागराची अशी आराधना करीत असतील कीं, "त्राता, धर्ता, तूंच आहेस, मग ने ना आम्हास आमच्या मायभूमीस परत."

भारताला सुमारे तीन हजार मैल लांबीचा किनारा लाभला आहे त्या किनाऱ्यावर कांही ठिकाणी रसिल्या अर्धांगिनीच्या हक्काने आणि लाडाने आगबोटी धक्क्याला धडका देतात. तर कोठे शृंगाराच्या कल्पनेने मोहरलेल्या परंतु लाजऱ्या बुजऱ्या नवोढा प्रेयसी सारख्या खूप दूर उभ्या असतात आणि मोटार लॉंचेस व पडाव यांच्या मध्यस्थीने किनाऱ्याशी सतत त्यांचे हितगुज चालू असते.

भारतीय नौदलाची जडण-घडण त्यातील काबाड-कष्ट, आनंदोत्सव, आपत्ति, अभ्यागताचे स्वागत, भारतीय संस्कृतीचे प्रत्यक्ष वैयक्तिक व्यवहारातून दर्शन आणि शेवटी समाजासाठी व्यक्तिगत सुखदुःखाची कणाकणाने घडणारी विस्मृति यांची झलक सादर करताना आम्हास फार आनंद होत आहे.

रिअर–ॲडमिरल नंदा यांचेपासून तो थेट सामान्य खलाशाकडूनही मिळालेल्या भरीव सहकार्यामुळेच हे दर्शन घडविणे शक्य झाले. जनता-संपर्क-अधिकारी मेजर राम मोहन राव, लेफ्टनंट रामनाथन् आणि त्यांच्या सहकार्यांनी तसेच 'प्रेस-इन्फर्मेशन ब्युरो मुंबई' येथील अधिकाऱ्यांनी आपुलकीने सदैव दिलेल्या मदतीमुळेच या अंकाची खुलावट होऊ शकली. आमचे मित्र श्री. य. स. दातार यानी आम्हाला केलेली मदत शब्दातीत आहे. 'शिवकुमार' 'बहिर्जी नाईक' 'माहितगार' या टोपणनावानीही श्री. दातार यानी संरक्षण-व्यवहार आणि संरक्षक दले याविषयी सातत्याने लिखाण चालू ठेवले आहे. हा अंक तयार करताना त्यानी सर्वतोपरी सहकार्य दिले. तसेच मित्रवर्य श्री. अशोक साठे यांचेहि ऋण नमूद केले पाहिजे. त्या सर्वांचे मनःपूर्वक आभार.

रत्नाकराने दिलेल्या या लेण्यात काही उणे आढळले, तर ते पामर मानवाच्या अल्पमतिमुळेच.

दीपावलीच्या या प्रयासामुळे कान्होजी आंग्रे यांचे झोपी गेलेले वंशज पुन्हा खडबडून जागे होवोत आणि साता समुद्रावर भारताचा ध्वज डौलाने, दिमाखाने फडकावीत राहोत, हीच ईश्वराचे चरणी प्रार्थना !

–संपादक



अनुक्रमणिका




# भारताचे सर्व श्रेष्ठ नौदल–प्रमुख श्री. चतर्जी यांचा 'दीपावली'स शुभ संदेश

**VICE-ADMIRAL**
**A. K. CHATTERJI**

**Navy Headquarters**
**New Delhi-11.**

I am very glad to know that a Naval special issue of the magazine 'Dipavali' will be brought out on 26th January 1967.

Neither our country's geographical position in the Indian Ocean nor our maritime traditions have made us fully conscious of the strategic importance of the Navy in the defence of our freedom. This deficiency can best be remedied only through the columns of our press. I am sure that the Navy special issue of 'Dipavali' would, therefore, be very instructive and beneficial to all its readers.

I wish the publishers of the magazine 'Dipavali' every success.

A.K. CHATTERJI




रदत् पथः वरुणः सूर्याय प्र अर्णांसि समुद्रिया नदीनाम् ॥
आत्मा ते वात : रज : आ नवीनोत् पशु : न भूर्णि : यवसे ससऽवान् ॥
गृत्स : राजा वरुण : चक्रे पतम् दिवि प्रऽइंखम हिरण्ययम् शुभे कम् ॥
अव सिन्धुम वरुण : द्यौ : इव स्थात् द्रप्स : न श्वेत: मृग : तुवित्मान् ॥
गंभीरऽशंस : रजस : विऽमान : सुपारऽक्षत्र : सतः अस्य राजा ॥
य : मृळयाति चक्रुषे चित् आग : वयम् स्याम वरुणे अनागा : अनु ॥

सूर्याच्या जाण्यायेण्याचा मार्ग वरुणाने आखून दिला. नद्या भेटीस येताच लाटानी उचंबळावे हे समुद्रास वरुणाने शिकविले. तृण भक्षण करून पुष्ट झालेला वृषभ डरकाळ्या फोडतो तसा गंभीर निनाद करणारा वारा हा वरुणाचाच श्वासोच्छवास आहे. सोन्याचे बनविलेले झोलेच आकाशात शोभेकरता टांगलेले असावे तसे दिसणारे हे तेजोगोल वरुणराजानेच निर्मिले आहेत. आकाशाप्रमाणेच या जलाशयाचा नियंतासुद्धा वरुणराजाच आहे. भीषण जलचर समुद्राच्या उदरात लपून रहावा तसा तेजोधवल जलबिंदूप्रमाणे वरुणराज सागरात गुप्त आहे. घनगंभीर स्वरात त्याच्याच स्तुतीचा उदघोष चालू असतो. हा घोष त्रिलोक व्यापून रहातो. वरुणराजाचे क्षात्रबल भक्तांना संकटातून तारून नेते. जे जे म्हणून अस्तित्वात आहे त्या त्यावर वरुणाची सत्ता चालते. अपराधी त्याला शरण गेला की वरुण सदयपणे त्याला क्षमा करतो. आपण सारे त्या वरुणाला शरण जाऊ आणि आमच्या पापातून मुक्त होऊ.

[ऋग्वेद. मंडल सातवे. सूक्त सत्त्यायशीवें (अंशतः) ऋषि वशिष्ठ:–श्रुतिबोधाच्या आधारे स्वैर अर्थ]

–आनंद साधले








# शिवरायांचे
# मराठा आरमार



**शिवरायांच्या मराठेशाहीच्या आरमाराचे मूळ स्वरुप, त्याचा विकास, आणि पुढे मराठ्यांच्या दुहीने मराठेशाहीचा जसा बळी घेतला, तीच दुही शेवटी मराठा आरमाराच्या मुळावर आली, याचा**


डॉ. भ. ग. कुंटे

**सह-संपादक-महाराष्ट्र जिल्हा दर्शनिका**


**यानी घेतलेला हा एक अभ्यासपूर्ण आलेख**

**१७ व्या** आणि १८ व्या शतकातील ज्ञात असलेल्या युद्धशास्त्रात सागरी सामर्थ्याला अतिशय महत्वाचे स्थान होते. परराष्ट्रांशी व्यापार करणाऱ्या व्यापारी गलबताना संरक्षण देणे आणि किनारपट्टीवरील प्रदेशाचे रक्षण करणे यासाठी बलाढ्य नाविक-दलाची आवश्यकता होती. छत्रपति शिवाजी महाराजांनी नाविक दलाचे महत्व ओळखून त्या दृष्टीने योग्य ती सिद्धता केली याबद्दल दुमत नाही. कोणत्याही देशाच्या संरक्षणदलाची जी अनेक अंगे असतात त्यामधे समतोलपणा राखणे अवश्य असते. उदाहरणार्थ विसाव्या शतकात सेनादल, वायुदल आणि नाविक दल ही संरक्षण-दलांची प्रमुख अंगे मानता येतील. या तिन्ही अंगात कार्यक्षमतेच्या दृष्टीने समतोलपणा जरूर पाहिजे. तद्वतच ही दले आणी-बाणीच्या प्रसंगी परस्पराना पूरक ठरली पाहिजे. अर्थात् हा समतोलपणा आणि पूरकता ही तत्कालिन युद्धकलेच्या प्रगतीवर अवलंबून असतात. शिवकाळात संरक्षण दलाचे प्रमुख अंग म्हणजे सेनादल. त्याकाळी तितकेच महत्व नाविकदलालाहि होते. संरक्षण-क्षमतेच्या दृष्टीने सेनादल आणि नाविकदल यामधे समतोलपणा होता एवढेच नव्हे तर ती दोन्ही दले परस्पराना पूरकहि होती. याचे कारण अगदी उघड होते. शिवरायाना मोगल, विजापूरकर आणि गोवळकोंड्याचे कुतुबशहा यांच्या प्रचंड सेनासंभाराबरोबर तोंड द्यावयाचे होते एवढेच नव्हे इंग्रज, डच, पोर्तुगीज, सिद्दी आणि काही अंशी फ्रेंच यांच्या कधी एकवटलेल्या तर कधी अलग अलग अशा नाविक दलाबरोबर त्याना झुंज द्यावयाची होती. आपल्या आरमाराची उभारणी करताना शिवरायानी याच गोष्टींचा प्रामुख्याने विचार केला. देशाला सुरक्षित ठेवावयाचे असेल तर आणि देश संपन्न आणि बलाढ्य करावयाचा असेल तर सामर्थ्यशाली नाविक-दल आपल्या पदरी पाहिजे ही गोष्ट शिवरायांनी ओळखली. मराठी आणि इतर भाषांतील तत्कालिन लिखाणात शिवरायांच्या आरमाराचे अनेक उल्लेख आपल्याला आढळतात. खाफीखान आपल्या मुन्तखाबउल्‌वक्त या ग्रंथात लिहितो "शिवाजीने जिवळ, पाबल आणि सुरतेजवळची इतर बंदरे यावर कबजा केला असून मक्केला जाणाऱ्या यात्रेकरूंवर त्याने हल्ले चढविले.




अनुक्रमणिका

त्याने किनारपट्टीला अनेक सागरी किल्ले बांधले असून सागरी दळणवळण त्यामुळे पूर्णपणे थांबले आहे."[1] सभासद आपल्या बखरीत शिवरायाच्या प्रचंड आरमाराची दखल घेऊन या आरमाराच्या संरक्षक आणि आक्रमक पवित्र्याची ग्वाही देतो. शिवाजीने प्रथम जेव्हा सुरत शहर लुटले त्यावेळी तेथील डच व्यापारी सुरतेच्या लुटीचा वृत्तान्त देताना, शिवाजी नदीच्या मुखात ४० लढाऊ गलबते घेऊन शहर लुटण्यासाठी तयार होता, अशी अफवा उठल्याची हकीकत सांगतात.[2] यापेक्षाहि प्रशंसनीय असे शिवरायांच्या आरमाराचे उल्लेख पोर्तुगीज कागदपत्रात येतात. १६ ऑगस्ट १६५९ रोजी गोव्याच्या गव्हर्नरने पोर्तुगालच्या राजाला पुढीलप्रमाणे पत्र पाठविले "इडालक्स (आदिलशहा) राजाचा बंडखोर अधिकारी क्साजी (शहाजी) याच्या मुलाने वसई आणि चौल या गावाजवळील प्रदेशावर आपली अधिसत्ता प्रस्थापित केली आहे. तो अतिशय सामर्थ्यवान असून वसई जिल्ह्यातील भिवंडी, कल्याण आणि पनवेल या बंदरात त्याचे लढाऊ जहाजे बांधण्याचे कारखाने आहेत. त्यामुळे आम्हाला नेहमी अतिशय जागरूक रहाणे भाग पडते. त्या जहाजाना समुद्रात बाहेर पडू न देण्याविषयी आणि त्यांचा मार्ग रोखण्याविषयी हुकूम आम्ही आमच्या अधिकाऱ्याना पाठविले आहेत."[3]

शिवरायाच्या प्रत्यक्ष अमलाखाली असलेला मुलुख आणि त्याला स्वकीय आणि परकीय यांजकडून होणारा सक्त विरोध घ्यानात घेतल्यास शिवरायाने आपल्या नाविक दलाचे सामर्थ्य वाढविण्याची केलेली कामगिरी खरोखरंच अद्वितीय समजली पाहिजे. आजचा म्हणून जो महाराष्ट्र आपण समजतो त्या भूप्रदेशाची अनेक राजकीय स्थित्यंतरे शिवरायानी स्वराज्याची निर्मिती केल्यानंतरच्या ३०० वर्षांच्या काळात झाली. पुणे, सातारा, सांगली, कोल्हापूर, थोडा रत्नागिरी, थोडा कुलाबा आणि थोडासा ठाणा, या जिल्ह्यांचे मिळून झालेले, शिवरायानी स्थापन केलेले हिंदवी स्वराज्य याला आजच्या महाराष्ट्राचे स्वरुप आले, ते १८ व्या आणि नंतर २० व्या शतकात. शिवरायांच्या स्वराज्याच्या त्या सीमा लक्षात घेतल्या आणि त्यांच्या आधीन असलेल्या साधनसामुग्रीचा विचार केला तर एतद्देशियांच्या नाविक दलाची मुहूर्तमेढ शिवरायानी रोवली असे म्हणण्यास काहीच हरकत नाही. वर उल्लेख केल्याप्रमाणे छत्रपतीच्या आरमाराची बांधणी कल्याण आणि पनवेल येथे झाली. शिवरायांच्या लढाऊ जहाजांची एकंदर संख्या किती असावी यासंबंधी निरनिराळ्या तत्कालीन लेखकांनी आपले अंदाज दिलेले आहेत. कृष्णाजी अनंत सभासद याने शिवरायांच्या आरमाराचे दोन विभाग असून प्रत्येक विभागात २०० निरनिराळ्या धर्तीची आणि आकाराची जहाजे होती

1. Elliot and Dowson, History of India as told by its own Historians, Vol. VII, p. 271.
2. Dutch Records, India Office, English Translation, Vol. 27, No. DCCXI.
3. Pissurlencar: Portuguese e Maratha, p. 4



VICE-PRESIDENT
INDIA



New Delhi
December 19, 1966

Dear Shri Dalal,

Thank you for your letter of the 10th inst.

I send my best wishes for the success of the Naval Special Issue of DIPAVALI to be brought out on the 26th January.

Yours sincerely,
**ZAKIR HUSAIN**

## थोरांचे आशिर्वाद

भारतीय नौदलाचे यथार्थ दर्शन घडविण्यासाठी नौदल-दर्शन विशेषांकाचा घाट दीपावलीने घातला. योजनेनुसार काम सुरु करण्यात आले. प्रत्यक्ष नौदलातील अनेक वरिष्ठ व कनिष्ठ अधिकाऱ्यांशी चर्चा सुरु झाली. लालित्याचे लेणे त्यावे म्हणून इतर मान्यवर लेखकांनाही या उपक्रमात सहभागी केले आणि हे सर्व करीत असतानाच मंगल प्रसंगी शुभ संकल्प हाती घेताना वडिलांचे आशिर्वाद घेण्याच्या विशुद्ध भारतीय परंपरेला अनुसरून आपल्या राष्ट्राची जीवन-नौका संभाळणाऱ्या श्रेष्ठींपुढे आशिर्वादासाठी नतमस्तक झालो.

भारतीय संरक्षक दलांचे सर्वोच्च सेनापति, राष्ट्रपति डॉ. राधाकृष्णन्, उपराष्ट्रपति डॉ. झकीर हुसेन, पंतप्रधान श्रीमति इंदिरा गांधी, गृहमंत्री श्री. यशवंतराव चव्हाण, संरक्षण मंत्री सरदार स्वर्णसिंग, रेल्वेमंत्री श्री. स. का. पाटील आणि नौदलप्रमुख रिअर–अॅडमिरल ए. के. चतर्जी यांचे आशिर्वाद दीपावलीने मागितले होते.

संदेश देण्याची असमर्थतता व्यक्त करणारे पत्र राष्ट्रपतींच्या चिटणिसांकडून आले. तर बहुधा कार्य बाहुल्यामुळे शुभेच्छा पाठविणे संरक्षणमंत्री सरदार स्वर्णसिंग याना जमले नसावे.

इतर सर्व श्रेष्ठींचे आशिर्वाद दीपावलीस लाभले. त्याबद्दल त्यांचे ऋणी आहोत. ते आशिर्वाद मोठ्या आनंदाने दीपावली प्रकाशित करीत आहे. –संपादक










**PRIME MINISTER'S**
**Secretariat**

Dear Sir,

The Prime Minister sends you her best wishes for the success of the special number your journal is devoting to the Indian Navy.

Yours faithfully,

(H. Y. SHARADA PRASAD)
Deputy Information Adviser
to the Prime Minister.

---

असे सांगितले आहे. मल्हार रामराव चिटणीस याने हा आकडा ४०० ते ५०० जहाजे असा दिला असून या आरमाराच्या बांधणीसाठी ५ ते १० लाख रुपये खर्च झाल्याचे सांगितले आहे. याऊलट कॉस्मे द् गांर्दा हा पोर्तुगीज लेखक ही संख्या २५ वर ठेवतो तर फायर हा इंग्रज प्रवासी खारेपाटण येथे शिवरायाच्या आरमारातील जहाजांची संख्या ३० एवढी देतो[1] अर्थात् सभासद आणि चिटणीस यानी दिलेली संख्या अतिशयोक्तीपूर्ण वाटते तर गार्दा आणि फायर यांचे अंदाज वस्तुस्थितीचे निदर्शक वाटत नाहीत. कारण शिवरायांचे आरमार केवळ खारेपाटण येथे एकवटलेले नसून राजापूर, जैतापूर, मालवण, सुवर्णदुर्ग वगैरे आरमारी तळावर विखुरले गेले होते आणि गार्दा आणि फायर यांच्या दृष्टोत्पत्तीस जे आरमारी दल आले ते शिवरायांच्या नाविक दलाचा एक भाग असावे. शिवरायांच्या आरमारी सामर्थ्याची खरी कल्पना इंग्रजांच्या हिंदुस्थानातील ठिकठिकाणच्या वखारीकडून जे अहवाल जात त्यावरून सहज येऊ शकते. ऑक्सेडेन २६ जून १६६४ रोजी लिहितो "शिवाजी समुद्रावरून आमच्यावर झडप केव्हा घालील याची आम्हाला भीति वाटते. या बंदरात असलेली सर्व जहाजे आणि गलबते काबीज करण्यासाठी तो काही लढाऊ जहाजे तयार करीत आहे आणि काही बांधत आहे

1. Fryer, A new account of East India and Persia P. 145.

अशी बातमी आहे. ह्या जहाजांची संख्या ६० आहे."[1] त्याच वर्षी २६ नोव्हेंबर रोजी सुरतेच्या व्यापारमंडळाने इंग्लंडला पाठविलेल्या पत्रात, शिवाजीने ८० लढाऊ जहाजे तयार करून वत्तीकोळा येथे पाठविली, असा उल्लेख आहे.[2] इ. स. १६६५ मध्ये शिवरायांनी बसरुरवर जी आरमारी चढाई केली त्यात ८५ लढाऊ गलबते आणि ३ मोठी जहाजे असल्याचे एका पत्रात म्हटले आहे.[3] इस. स. १६७० च्या ऑक्टोबर महिन्यात शिवाजीची ६० ते ७० लढाऊ गलबते मुंबई बंदरानजीक येऊन थडकल्याचा[4] तर नोव्हेंबरमध्ये १६० छोटया आणि मोठया लढाऊ जहाजांचा काफला शिवाजीने तयार केला असल्याचा असे दोन उल्लेख आपल्याला मिळतात.[5] शिवाजी महाराजांच्या नाविक सामर्थ्याची कल्पना वरील उल्लेखांवरून आपल्याला येऊ शकते. आरमारातील लढाऊ गलबतांच्या बांधणीचे काम सातत्याने चालू असून शिवरायांच्या आरमारात एकंदर १५० ते २०० पर्यंत लढाऊ गलबते असावी असे मानण्याला भरपूर जागा आहे.

जमिनीवरील युद्धाप्रमाणे आरमारी युद्ध ही एक कला आणि तंत्र आहे. विसाव्या शतकातील सागरी देशांच्या आरमारात विनाशिका, पाणबुडया, विमानवाहू नौका, लढाऊ जहाजे वगैरे अनेक प्रकारच्या जहाजांचा समावेश होतो. या प्रत्येक आरमारी दलाकडे विशिष्ट प्रकारची कामे युद्धकाळात वाटून दिली जातात. १७ व्या आणि १८ व्या शतकात आरमारी युद्धाचे शास्त्र जरी इतके प्रगत झाले नव्हते आणि आजच्या इतके जरी लढाऊ जहाजांचे प्रकार तेव्हा अस्तित्वात नव्हते तरी तेव्हाहि लढाऊ गलबतांचे गट पाडलेले असत आणि प्रत्येक गटाकडे विशिष्ट कामे सोपविली जात असत. शिवछत्रपतींच्या आरमारात पाच प्रकारची लढाऊ जहाजे होती. ती पुढीलप्रमाणे–घुरब, गलीवत, पाल, शिबर आणि मचवे. या लढाऊ जहाजांच्या बांधणीची उत्कृष्ट वर्णने अनेक इंग्रज लेखकांच्या ग्रंथात सांपडतात.[1] ह्या जहाजांचे वजन ७० ते ३०० टनाच्या दरम्यान असून त्यावर ४ ते ८ तोफा असत. हल्ली ज्याप्रमाणे युद्धनौकांबरोबर विनाशिका शत्रूवर हल्ला करण्याचे वेळी पाठविल्या जातात (Support and covering fire) त्याप्रमाणे घुरब या युद्धनौकेबरोबर एक किंवा दोन गलीवत असल्याखेरीज घुरब शत्रूवर कधीहि हल्ला करीत नसे. युद्धनौकांवर विशेषत: गलिवतवर ६ तोफा आणि

1. Foster, The English Factories in India, 1661-1664, p. 345.
2. Foster, The English Factories in India, 1661-1664, p. 358.
3. Foster, The English Factories in India, 1665-1667 Pp. 77-78.
4. Factory Records, Surat, Vol. 105, fol. 55
5. Factory Records Surat, Vol. 105, fol. 78 and Vol. 3 fol. III.

---

1. Orme, Military Translations in Indostan; A faithful narrative of the capture of the ship Derby; Churchill's Voyages; Hamilton, A new account of the East Indies.

६० लढाऊ सैनिक असत. या लढाऊ सैनिकांची विभागणी गोलंदाज आणि शत्रूवर हल्ला करणारे शिपाई यामध्ये होत असे. या लढाऊ शिपायांजवळ असणारी हत्यारे पायदळ शिपायांबरोबर असणाऱ्या हत्यारासारखीच असत. ही हत्यारे म्हणजे तलवार, भाला, धनुष्य आणि बाण. एक गोष्ट या ठिकाणी लक्षात ठेवण्याजोगी आहे आणि ती ही की मराठ्यांमध्ये दर्यावरील सफरींची आणि पराक्रमांची आवड ही सतराव्या शतकाच्या अखेरी अखेरीला निर्माण झाली आणि ही आवड मराठ्यांच्या आरमाराचा इंग्रजांच्या हातून नाश होईपर्यंत टिकली. शिवरायांना दर्यासारंग म्हणून जे अधिकारी मिळाले ते बव्हंशी मुसलमान होते. या संदर्भात मायनाईक भंडारी, दर्यासारंग, दौलत खान, सिद्धी मिश्री, सिद्दी संबल आणि इब्राहिमखान ही नावे शिवरायांच्या आरमारातील अधिकारी म्हणून लक्षात ठेवण्याजोगी आहेत. शिवरायांच्या अशा तऱ्हेने सुसज्ज असलेल्या आरमाराने स्वराज्याच्या किनारपट्टीच्या संरक्षणाची आणि व्यापारी जहाजाना संरक्षण देण्याची कामगिरी चोखपणे बजावली यात काहीच संशय नाही.

वर म्हटल्याप्रमाणे शिवरायांच्या आरमाराचे महत्व हे त्यांच्या सेनादलाइतकेच होते. शिवरायांच्या सेनादलाने ज्याप्रमाणे अनेक नेत्रदीपक विजय औरंगजेब आणि विजापूरकर यांच्या कसलेल्या सेनासमुदायावर मिळविले तद्वतच शिवरायांच्या आरमाराने गाजविलेले काही पराक्रम नमूद करण्यासारखे आहेत. त्यादृष्टीने पहिला उल्लेख शिवरायांच्या बार्सिलोद (बसरूर) वरील स्वारीचा करावा लागेल. या आरमारी चढाईत शिवरायांनी जातीने भाग घेतला होता. ही मोहीम त्यांनी इ. स. १६६५ च्या फेब्रुवारी महिन्यात काढली. या नाविकदलात ८५ लढाऊ जहाजे आणि ३ मोठी गलबते होती. पश्चिम किनाऱ्यावरून पुढे सरकत सरकत या आरमाराने गोव्यावरून आणखी खाली दक्षिणेकडे बसरूरच्या दिशेने शिडे हाकारली आणि बसरूरवर झडप घातली. बसरूर शहर लुटून फस्त करण्यात आले. वरील दलापैकी १२ जहाजे पाठीमागे ठेवून उरलेली शिवरायांनी परत पाठवून दिली.[1]

शिवरायांच्या आरमाराने दुसरी चढाई, इ. स. १६७० मध्ये शिवराय सुरतेवर स्वारी करून त्या शहरांची लूट करीत असतांना, सुरतेच्या दिशेने केली. त्या वर्षाच्या नोव्हेंबर महिन्यात नागाव[१] येथे शिवरायांनी १६० लढाऊ गलबतांचे प्रचंड आरमार जमविले आणि मोठ्या संख्येने फौजेला सज्ज राहण्याचा हुकूम दिला. चाळीस दिवसांच्या प्रवासाला पुरेल इतक्या अन्नधान्याची तरतूद करण्यात आली. परंतु स्वारीचे प्रयोजन काय यासंबधी अतीव गुप्तता राखण्यात आली. मराठ्यांचे आरमार मुंबईपासून इतक्या नजिक हालचालीकरता सज्ज झालेले पाहून मुंबईकर इंग्रजांची घाबरगुंडी उडाली असल्यास नवल नाही. सुरतेला मुंबईकर इंग्रजांनी १७ नोव्हेंबर रोजी बातमी कळवली

1. Foster, The English Factories in India, 1665-1667, P. 77-78.

१ जिल्हा कुलाबा, अलिबागपासून ३ मैल.



गृहमंत्री, भारत



नवी दिल्ली
दिनांक ४ जानेवारी १९६७

**पाकिस्तानने भारतावर केलेल्या आक्रमणाच्या वेळी भारतीय नौ-सेनेने केलेली भरीव कामगिरी भारतीय सेनेच्या उच्च परंपरेत भर टाकणारीच होती. भारताची जवळपास तीन चतुर्थांश सीमा समुद्राने वेढली आहे. आणि म्हणूनच संरक्षणाची बाजू मजबूत करण्यासाठी नौ-दलहि आधुनिक शस्त्रास्त्रांनी व साधनांनी सुसज्ज असणे आवश्यक आहे. गेली तीन, चार वर्षे यादृष्टीने आम्ही प्रयत्नहि करीत आहोत. अशा वेळी 'दीपावली' मासिकाचा 'नौ-दल विशेषांक' प्रकाशित करण्याची कल्पना स्तुत्य आहे.**

**माझ्या शुभेच्छा.**

**—यशवंतराव चव्हाण**

ती अशी "त्याचा (शिवाजीचा) काय बेत आहे हे आम्ही सांगू शकत नाही किंवा आम्ही कल्पनाहि करू शकत नाही. परंतु शिवाजी कशा तऱ्हेचा माणूस आहे हे कळल्यावर अशा गोष्टीविषयी जागरूक राहणे जरूर आहे. काल त्याच्याकडून एक ब्राह्मण आला होता. काही मित्रमंडळीबरोबर बोलत असताना त्यांनी चौकशी केली तेव्हा तो ब्राह्मण म्हणाला की आपल्या धन्याने एकंदर आठ जागी जिवाची कुरबानी करून घेण्याचा निश्चय केला आहे. त्यात मुंबईचा अंतर्भाव आहे. तो ब्राह्मण काही नावाडी मिळविण्यासाठी आला होता. तो मुंबई बेटावर केवळ दोनच तास राहिला. तो आणखी काही काळ राहता तर आम्ही त्याच्यापासून निश्चित काहीतरी माहिती काढली असती किंवा त्याला अटकावून तरी ठेवले असते."[२]

तारीख २१ नोव्हेंबर १६७० रोजी मुंबईच्या दुय्यम गव्हर्नरने पुढील मजकुराचे पत्र शिवरायांच्या आरमाराच्या हालचालीविषयी रवाना केले. "शिवाजीच्या आरमारात एकंदर १६० छोटी जहाजे आहेत. ही जहाजे माझ्या स्वतःच्या नोकराने मोजून

2. Factory Records, Surat, Vol. 105, fol. 72.










रेल्वेमंत्री, भारत



नवी दिल्ली,
दिनांक २५-१२-१९६६

स. न. वि. वि.

आपले ८ डिसेंबरचे पत्र मिळाले. 'दीपावली'चा नौदल-दर्शन विशेषांक आगामी प्रजासत्ताक-दिनी प्रसिद्ध करीत आहांत याबद्दल अभिनंदन. संरक्षणाच्या त्रि-दलापैकी नौदलास तितकेच महत्व आहे जितके पायदळ व वायुदल यांना आहे. तथापि नौदलाची असावी तितकी माहिती वाचकास नसावी. भारत-पाकिस्तान लढ्यांत आरमारानेही कामगिरी बजावली हें सर्वश्रुत आहे. अशावेळीं नौदल-दर्शन विशेषांकाचा उपक्रम आपण हातीं घेतला हें योग्यच होय. आपल्या या प्रयत्नास यश मिळून विशेषांक माहितीपूर्ण व मनोरंजक होईल यांत शंकाच नाही.

कळावे.

आपला

**स. का. पाटील**

बघितली. त्याला मी गुप्तहेर म्हणून पाठविले होते. या आरमाराचा अधिपति आणि कप्तान 'वेंटगी सारंग' या नावाचा आहे. त्याला दर्यासारंग असे म्हणतात. त्याच्याशी गेली ७-८ वर्षे माझा पत्रव्यवहार आहे. त्याच्याकडून काही बातमी लागली तर लागेल या हेतूने त्याला मी एक पत्र लिहिले आणि मोहिमेत त्याला यश चिंतिले. त्याला शक्य असेल ती मदत देण्याचे आश्वासनहि मी दिले. त्याला मी असे कळविले कीं त्याच्या बेतात जर काही अडथळा येणार नसेल तर त्याचा उद्देश त्याने मला कळवावा. यावर त्याने मला कळविले की "त्याच्या हालचाली जरी अतिशय गुप्त असल्या तरी मी त्याच्याकडे एकाद्या अतिशय विश्वासू माणसाची रवानगी केल्यास तो मला तोंडी निरोप देईल. यावर त्याच्याकडे मी मोदीच्या मुलाला रवाना केले. दर्यासारंगने त्याला एका बाजूला नेऊन सांगितले की "आपला धनी १०००० घोडेस्वार आणि २०००० पायदळ घेऊन सुरतेवर चाल करून जात आहे. त्याला त्या ठिकाणी ३००० फौज घेऊन मी मिळावे असे ठरले आहे. सुरतेचा किल्ला पडल्यावर तो भडोचवर चाल करून जाणार आहे. तेव्हा मी अतिशय जागरुक राहून कोणावरहि विश्वास न ठेवता आणि प्रत्येक जहाजाची तपासणी केल्याशिवाय न राहता वागावे असा त्याचा मला हुकूम आहे." दर्यासारंगाने वरील माणसाला असेहि सांगितले की ख्रिस्ती लोकांनी आपल्या धन्याच्या बेतात अडथळा आणण्याचा प्रयत्न न केल्यास त्यांच्या वाटेला तो जाणार नाही."[1] अर्थात् इंग्रजानी दर्यासारंगच्या निरोपावर विसंबून न राहता सर्व प्रकारची दक्षता घेतली. इतकेच नव्हे तर शिवरायांच्या विरुद्ध इंग्रज, डच आणि पोर्तुगीज या तीन युरोपियन सत्तांनी एकजूट करण्याचाहि प्रयत्न केला. वरील आरमार नागावहून निघून थळ येथे पोहोचले. तेथून निघून शनिवारी ते माहिमच्या बंदरात आले. परंतु त्या दिवशी सकाळी शिवरायांनी दोन लढाऊ गलबते पाठवून सर्व आरमार परत बोलावून घेतले. ही मोहिम शिवरायांनी योजनेप्रमाणे कां रेटली नाही याचा अंदाज लागत नाही.

वर सांगितल्याप्रमाणे इंग्रज, पोर्तुगीज आणि डच या युरोपियन सत्तांप्रमाणे जंजिऱ्याच्या शिद्याने शिवरायांशी वैर धरले. शिद्याची सत्ता मुळात उखडून काढावी हा त्यांचा प्रथमपासूनचा बेत. अर्थात् मराठेशाहीला ही कामगिरी पार पाडता आली नाही आणि शिद्याचे जमिनीवरचें सगळे राज्य जरी मराठ्यांनी जिंकून घेतले तरी जंजिऱ्याच्या सुरक्षित किल्ल्यात मराठेशाहीच्या विनाशानंतर १५० वर्षे शिद्दी टिकून राहिला. इ. स. १६४८ पासूनच शिद्याला शिवरायांनी रेटावयास सुरवात केली होती आणि आता युद्धाची धुमश्चक्री जी उडाली होती ती प्रचंड दगडी बुरुजांनी वेढलेल्या जंजिऱ्याच्या किल्ल्यासाठी. त्यांनी जंजिऱ्यासमोर बंदर बांधून पाहिले आणि जंजिऱ्यावर तोफांचा भडिमार करण्यासाठी तरता तोफखाना तयार केला. एकदा तर शिद्याची एवढी गळचेपी झाली की शिवरायांना जंजिरा बेट विकून टाकण्यास देखिल तो तयार झाला. परंतु त्याच्या सहकाऱ्यांनी शिद्याचा बेत हाणून पाडला. यानंतर शिद्दी हे विजापूरकरांचे सेवक न राहता आपली राजनिष्ठा त्यांनी मोगलांकडे सुपूर्द केली. शिवरायांच्या मृत्यूनंतर औरंगजेबाच्या काळात आणि उत्तर मराठेशाहीत शिद्दी आणि मराठे यांचा झालेला झगडा सर्वश्रुतच आहे.

शिवरायांच्या कारकीर्दीत मराठेशाहीच्या आरमाराचे स्वरुप आणि त्याची कामगिरी याचा थोडक्यात असा आढावा आहे. मराठेशाहीच्या आरमाराची सुरुवात शिवरायांनी केली आणि या आरमाराचा विकास करून ते बलाढ्य करण्याची कामगिरी त्यांनी पुढील पिढीवर सोपविली. परंतु त्या दुहीने मराठेशाहीचा बळी घेतला तीच दुही मराठ्यांच्या आरमाराच्या मुळावर आली, यापेक्षा खेदजनक दुसरी गोष्ट असू शकेल काय? ●●●

1. Factory Records, Surat, Vol. 150, fol. 78.



अनुक्रमणिका






अनुक्रमणिका











**फायर वन....गाझी हादरली ! फायर टू, ती भेदरली !! फायर थ्री....पाण्याखाली दडली !!! सप्टेंबर १९६५ मधे भारतीय नौदलाने 'गाझी' या पाकिस्तानी पाणबुडीला एकाच दणक्यात निकामी केले....**

## रिअर-ॲडमिरल आर्. एस्. डेव्हिड

**फ्लॅग–ऑफिसर–कमांडिंग, बाँबे.**

**यानी भारतीय नौदलाची बहादुरी प्रत्यक्ष तुमच्या डोळ्यांपुढे उभी केली आहे.**

**तसे** पाहिले तर आम्हा वरिष्ठ अधिकाऱ्याना पाकिस्तानी हल्ल्याची कल्पना होती. जानेवारी १९६५-मध्ये दिल्ली येथे सर्वोच्च पातळीवर एक बैठक झाली होती. त्यावेळी सर्व संबंधिताना संभाव्य धोक्याची अस्पष्ट कल्पना देण्यात आली होती. संदिग्ध स्वरुपात जे काही सांगण्यात आले त्याचा खरा अन्वयार्थ आम्ही लावू शकलो नाही तर वीस पंचवीस वर्षे दर्यावर घालवूनही आम्ही कोरडेच की !

जसजसा काळ उलटू लागला, तसतसा तो धोका स्पष्ट होत गेला. आम्हीही आमच्यापरी सिद्ध होतोच. "प्रिपेअर इन पीस टू फाईट इन वॉर" (शांततेच्या काळातच युद्धसिद्धतेचे शिक्षण घेतले पाहिजे) असा एक लष्करी सिद्धांत आहे. त्याचे पालन आम्ही १९४७ पासून अधिक आत्मीयतेने, कसोशीने करीत होतो. १९६१ च्या डिसेंबरात गोमंतक विमोचन घडले. त्यात नौदलाने भाग घेतला होता. त्यावेळी पहिल्यांदा नाविकानी तोफा डागल्या. पण ती सर्वस्वी स्वतंत्र हकीकत आहे. तथापि तत्कालीन युद्ध परिस्थिती व १९६५ मधील अवस्था यात महदंतर होते.

### संघर्षाची पार्श्वभूमी

गोमंतक–विमोचनाचे वेळी पाकिस्तान–चीन युतीची शक्यता मुळीच वाटत नव्हती. अरब गणराज्याचा पूर्ण पाठिंबा भारताला होता. त्यामुळे सुवेझ कालव्याचे नाके आपोआप बंद होते. इंडोनिशिया घुसळून निघत होता. त्याचा परिणाम म्हणून सिंगापूर येथील ब्रिटीश आरमार सक्रीयपणे युद्धात गुंतेल, हेही सर्वथैव अशक्य होते. तशात राष्ट्रकुलात राहूनही भारत आपल्या सार्वभौमत्वासाठी झगडत होता. त्यामुळे पोर्तुगीजाना उघडपणे साह्य करणे ब्रिटनला शक्य नव्हते. तिबेट गिळंकृत करून पंचशीलची ढेकर देण्यात चीन गर्क होता. युद्धशास्त्राचे दृष्टीने विचार करता, पाकिस्तानी नौदलाने पोर्तुगीजांच्या मदतीस जाणे, म्हणजे उघड उघड आक्रमण करणे होते. तितक्या लांब पल्ल्यावरून नाविक युद्ध खेळणे त्यावेळी पाकिस्तानला शक्य नव्हते. कारण पूर्व बंगालचा किनारा असुरक्षित सोडून पूर्व भारताला वळसा घालणे व अरबी समुद्रात घुसणे हा धोका पत्करल्यास पाकिस्तानच्या अस्तित्वासच हादरा बसला असता. प. पाकिस्तानच्या सागरी सामर्थ्याचा समाचार घेण्यास त्यावेळी भारतीय नौदल समर्थ होते.

उलट १९६५ साली परिस्थिती सर्वस्वी प्रतिकूल बनली होती. चीनचा जबरदस्त आधार पाकिस्तानी लष्कराला होता. अमेरिकेचे सातवे आरमार हिंदी महासागराचे पलिकडे वावरत होते. सिंगापूर येथील ब्रिटीश आरमार आधीच कमी. त्यातच इंडोनिशिया-मलेशिया भडक्यामुळे तेही तेथेच गुंतून पडलेले. पाकिस्तान हे धर्माधिष्ठित राष्ट्र असल्याने धर्माला राजसत्ता बनविलेल्या जवळजवळ सर्वच राष्ट्रांचा त्याला पाठिंबा होता.












अनुक्रमणिका

सीटो-सेंटो-नाटो करारामुळे नौदलाचे दृष्टीनेही विविध आधुनिक सामग्री पाकिस्तानला मिळाली होती. प्रमाण कमी असले, तरीही ती सामग्री अत्याधुनिक होती. पूर्वेस चीन, दक्षिण—पूर्वेस इंडोनिशिया, दक्षिण—पश्चिमेस मलदीव येथील रॉयल नेव्हीचे केंद्र, पश्चिमेला इराण, तुर्कस्तान, इराक आदींचा आधार, या घटकांमुळे त्याचे पारडे जड होते. ब्रह्मदेश मित्र नसला तरी त्याचा वैरी खासच नव्हता. मलेशियास इंडोनेशियाचा काटशह परस्पर बसला होता. व्हिएतनाम प्रकरणामुळे अमेरिकन सातवे आरमार प. अमेरिका ते मलेशियापर्यंत पॅसिफिक महासागर, तसेच चिनी समुद्र व हिंदी महासागरात आसपास विखुरलेले होते. सिलोनकडूनही अपायाची धास्ती नव्हती. शेवटची आणि सर्वात महत्वाची गोष्ट म्हणजे पूर्व आणि पश्चिम पाकिस्तान मिळून जेमतेम एक हजार मैल किनाऱ्याचे संरक्षण एवढीच पाकिस्तानी नौदलाची जबाबदारी होती. भरीस भर पाणबुड्याही होत्या. हो पाणबुड्या! कारण एका पाणबुडीच्या ताकदीवर तीन हजार मैलांच्या भारतीय किनाऱ्यावर धुमाकूळ घालणे ही गोष्ट हास्यास्पद ठरते. कारणे? एकतर अॅटलांटिक किंवा पॅसिफिक महासागराइतकी खोली अरबी समुद्राची नाही. दुसरे, भारताच्या किनाऱ्याला पूर्ण वळसा घालून निसटणे हे एकादे वेळी शक्य असले तरी नेहमीच ते शक्य होत नसते. पाणबुडीला देखील शास्त्रोक्त कारणांसाठी समुद्राच्या पृष्ठभागावर येणे भागच पडते. त्याबाबतच्या मर्यादा उल्लंघणे म्हणजे पाणबुडी व तिचे अधिकारी आणि नाविक यांना निष्कारण जलसमाधि देणे! अशा या पूर्णपणे बदललेल्या परिस्थितीत आम्हाला गनिमाशी टक्कर द्यावयाची होती. आमचेजवळ तर एकसुद्धा—अगदी बागुलबुवा म्हणून का होईना—पाणबुडी नव्हती. आपले आरमार एरवी देखील सतत पांगवून ठेवलेले असते. मग युद्धकाळात वेगळे ते काय घडणार?

पण आमचे मनोधैर्य? ते मात्र हिमालयासारखे दृढ होते. भारतीय जवानानी आणि भारतीय वायुसैनिकांनी वेळोवेळी आपल्या कर्तृत्वाची पावती दिलेली होती. घरातील तीन भांवडांपैकी पहिले आणि शेवटचे लाडके असते. तर मधले मात्र दोडके ठरते. पहिला तो बाळचा, शेवटचा तो लाल्या आणि मधला कार्ट्या अशी वर्गवारी आईसुद्धा करते. लष्कर जेष्ठ, वायुसेना कनिष्ठ आणि नौदल—नतद्रष्ट अशीच भावना होती सर्वांची! विनाकारण टीकेचे वाग्बाण आम्हाला सहन करावे लागत होते. संधी मिळत नसल्याने आमचे कर्तृत्व जागच्या जागी खदखदत होते. अखेर एकदाचा आमचाहि दिवस उजाडला, पण हाय रे दुर्दैवा! फारसे काही करण्यापूर्वीच तो मावळलाही. तथापी एक गोष्ट खरी. भारत पाकिस्तान संघर्षाचा काळ आमच्या दृष्टीने "फुल-ड्रेस रिहर्सल" ठरली. आम्ही बरेच (अनायासे) नवे पाठ शिकलो. जुन्या पाठांची अचानक उजळणी झाली. अचानक बिघडलेल्या यंत्रांची झटपट दुरुस्ती भर समुद्रातही, पुरेशा आवश्यक साधनांशिवायही करण्यात आमचे खलाशी जागतिक नौदलांतील कोणत्याही खलाशांइतके सरस ठरेल. आमचे तरणेबांड अधिकारी डावपेच ओळखण्यात व सवाई बाजी टाकण्यात यशस्वी झाले. तसे पाहिले, तर नौदलाचे दृष्टीने कच्छवरील आक्रमणापासून तो शस्त्र-संधी (सप्टेंबर)—हा सर्व काळ चोवीस तास टांगत्या तलवारीचा होता. आनंदाची व अभिमानाची गोष्ट अशी की तुटपुंज्या साधनांनिशी आम्ही आमची कामगिरी चोख बजावली. ती कामगिरी कोणती?

## भारत-पाकिस्तान युद्धाची नांदी

कच्छवरील आक्रमण सुरू झाले, त्या क्षणापासूनच आम्ही नाविक अधिकारी आणि खलाशी युद्धमग्न झालो. तरीहि ऑगस्टपर्यंत आमचा पवित्रा पूर्णपणे संरक्षक स्वरुपाचा होता. कोणत्याहि परिस्थितीत केंद्रीय मंत्रीमंडळाच्या अनुमतीशिवाय तोफ डागावयाची नाही असे स्पष्टपणे बजावण्यात आले होते. ऑगस्टपासून परिस्थिती झपाट्याने विकोपाला जाऊ लागली. आणि अखेर स्वसंरक्षणार्थ शस्त्र उपसणेच आम्हाला भाग पडले. आणि सर्वच चित्र पालटले. 'विक्रांत' पासून तो थेट साध्या लॉंचवरील खलाशी आणि अधिकारी संतप्त होऊन उठला. लढण्याची संधी दिल्याबद्दल एका अर्थी त्यानी पाकिस्तान्यांचे आभार मानले. (तो शत्रु पळपुटा ठरला हे आमचे दुर्भाग्य!)

बंदरांचे रक्षण, सागरी व्यापारी वाहतूक करणाऱ्या भारतीय तसेच परराष्ट्रीय व्यापारी आगबोटींचे संरक्षण आणि भर समुद्रात गनीम आढळल्यास त्याचा नायनाट करणे ही त्रिविध कामगिरी आमच्यावर सोपविण्यात आली होती.

बंदरांचे संरक्षण करण्यासाठी विशिष्ट पद्धतीने नाविक व्यूहरचना करण्यात आली. बंदरात प्रवेश करण्याच्या साऱ्या दिशा रोखून धरण्यात आल्या. हवाई—हल्ला—प्रतिबंधक तोफखाना सुसज्ज ठेवण्यात आला. समुद्र किनाऱ्यापासून दूरवर उड्डाण करून गनिमांच्या नौदलाची हालचाल कळविणे; तसेच शत्रूच्या बॉंबफेक्या आणि लढाऊ विमानाना जिथल्या तिथे रोखून त्यांची मरम्मत करणे; शत्रूचे विमानदल आणि आरमार यांचे सांकेतिक संदेश



युद्धनौकांचा काफिला कामगिरीवर निघाला आहे

पकडून ते संबंधित कार्यालयास तावडतोब धाडणे ही कामगिरी प्रामुख्याने नौदलाच्या वैमानिकांवर सोपविण्यात आली होती.

कच्छ ते कन्याकुमारी आणि कन्याकुमारी ते थेट पूर्व बंगालच्या किनाऱ्यापर्यंत भारतीय सागर सीमेत शत्रूच्या आरमाराला घुसून न देणे, तसेच त्या संपूर्ण टापूतील जलवाहतूक सुरळीतपणे चालू ठेवणे, हे झाले एक काम. कन्याकुमारीपासून दक्षिण पूर्वेकडे इंडोनेशियापर्यंत, दक्षिण–पश्चिमेकडे आफ्रिकेच्या संपूर्ण पूर्व किनाऱ्यावर बारीक नजर ठेवणे, मुंबई ते एडन आणि मुंबई-कराची; तसेच मुंबई ते पर्शियाचे आखात हा पश्चिमेकडील टापू; पश्चिम किनाऱ्यावरील मालदीव लखदीव बेटे; सिलोनची सामुद्रधुनी, अंदमान निकोबार–द्वीप समुद्र आणि डाक्क्यापासून पेनँगपर्यंतचा–पूर्व–पाकिस्तान ब्रह्मदेश मलेशिया यांचा किनारा, तसेच इंडोनेशियन आरमाराची हालचाल या सर्व अत्यंत जोखमीच्या कामाचा बोजा आकारमानाने अगदीच अत्यल्प असलेल्या नौदलावर येऊन पडला. भारतीय नौदलाने त आव्हान स्वीकारले.

## आणि सारेजण कामाला लागले

सर्वांच्या रजा तातडीने रद्द झाल्या. काश्मिर ते कन्याकुमारी आणि मुंबई ते कलकत्ता या विस्तीर्ण भूभागातील जे जे नाविक आणि अधिकारी या ना त्या कारणाने रजेवर होते त्यांना कामावर तडकाफडकी रुजू होण्याचे हुकूम सुटले. ती तार वाचून ते सर्वजण आनंदाने अक्षरशः धुंद झाले आणि एका झटक्यात बाकीच्या सर्व गोष्टींना लाथाडून सर्वजण आपापल्या ठिकाणी हजर झाले.

बंदरांचे संरक्षण करणाऱ्या बोटी तसेच दर्यावर वावरणाऱ्या बोटी अक्षरशः अधीर झाल्या होत्या. 'ॲक्शन स्टेशन्स' अनेक वेळा पुकारण्यात आली. गरजेनुसार ती ती आगबोट, "कंडिशन एक-दोन किंवा तीन"मधे वावरू लागली. रेडिओ–टेलिफोन्सचे दळणवळण सुद्धा बंद करण्यात आले. फार काय प्रसंगी आगबोटी-वरील उजेडाचा किरण सुद्धा बाहेर दिसू नये, म्हणून हवा खेळ-विण्यासाठी असलेली लोखंडी झडपेहि बंद करण्यात आली. त्यामुळे "शिप्स–कंपनी" (बोटीवरील सर्व कर्मचारी) अनेक वेळा बटाट्यासारखी उकडली गेली. साऱ्यांचे लक्ष सदैव "ॲक्शन स्टेशन्सच्या" घंटीकडे लागलेले होते. असाच एक काफिला बंदरा-तून बाहेर पडतो न पडतो, तोच त्यातील एक लढाऊ आगबोट यांत्रिक बिघाडामुळे माघारी बोलवावी लागली. त्यावेळचा प्रसंग तर हृदय हेलावणारा ठरला. त्या दुर्दैवी आगबोटीच्या कमांडिंग ऑफिसरपासून तो थेट साध्या, अननुभवी खलाशापर्यंत सर्वांची एकच विनंति होती–कसेही करा, इतर आगबोटींवर आम्हाला सामावून घ्या. अर्थातच ते शक्य नव्हते. म्हणून चडफडत, मनातल्या मनात वरिष्ठांवर जळफळत, ते परतले. याहूनहि एक हृदयस्पर्शी किस्सा घडला. अखंड भारतातील वायव्य सरहद्द तसेच पंजाबमधील अनेक उमदे तरुण १९३८–३९ साली नौदल अधिकारी बनले होते. त्यापैकी कित्येकांच्या घरादाराचा सत्यानाश फाळणीत झाला होता. अशाच एका (आता वरिष्ठ जागी असलेल्या) अधिकाऱ्यावर बंदरातच राहून सर्व सूत्रे हलविण्याची आपत्ती आली. शत्रूशी लढण्यासाठी पाठवावे म्हणून त्याने वरिष्ठांना विनंति केली, गयावया केले, तो पाया पडला. आणि त्या वरिष्ठाला नाइलाजाने त्याला नकार देणे भाग पडले, तेव्हा फाळणीचे हलाहल पचवून उमदेपणे जीवन पुन्हा फुलविणारा तो कर्तबगार अधिकारी अक्षरशः रडवेला झाला. शत्रूशी झुंज घेण्याची नाविकांची इच्छा किती प्रबळ बनली होती, याची प्रचिती या दोन उदाहरणानी येते.

## उघडा पडलेला पूर्वकिनारा

आपल्या बंदरात गनिमांची आगबोट घुसू नये म्हणून प्रत्येक बंदराचे संरक्षणासाठी, आधीच अपुऱ्या असलेल्या आपल्या लढाऊ आगबोटींपैकी, काही बोटी तेथे ठेवण्यात आल्या. बंदराचे सर्व मार्ग पाळतीखाली होते. परवलीचा शब्द तसेच ओळख पटल्या-नंतर मगच वाहतूक करणाऱ्या प्रत्येक आगबोटीला बंदरात प्रवेश मिळे, अथवा बंदराबाहेर पडता येत असे. ते काम जागरूकपणे व्हावे म्हणून प्रत्येक ठिकाणी विशिष्ट यंत्रणा उभारण्यात आली होती. त्यामुळे बंदरांचे प्रवेश-मार्गात सुरुंग पेरण्याचा उपद्व्याप गनीम करू शकला नाही. तसेच व्यापारी वाहतूकही निर्वेध सुरू राहिली. **मात्र नौदलाची ताकद संपूर्ण भारतीय किनाऱ्यावर टेह-ळणी करण्यास अपुरी पडल्याने बंगालच्या उपसागरातील मालवाहू**

---

**जलपरी**



**एक होती जलपरी, तिचा झाला 'फ्राय' खाता खाता नाविक म्हणाले, 'हाय ! हाय !'**



अनुक्रमणिका

**आगबोटी तसेच बंदरे अक्षरशः निराधार होती. त्या त्या बंदरातील विमानविरोधी तोफा एवढे एकच एक हत्यार त्याना उपलब्ध होते. तीच गत अंदमान व निकोबार बेटांची होती. त्यामुळे १९६२ साली नेफात असहाय्य बनलेल्या जवानांची गत काय झाली याची पुरेपूर कल्पना आम्हाला प्रत्यही येत होती. तशात एकदा त्या भागात गनिमाच्या पाणबुडीचा शोधही लागला होता. त्यावेळी डोके दोन्ही हातानी गच्च धरून बसण्यापलिकडे आम्ही काहीही करू शकत नव्हतो.**

त्याचे असे झाले. भारतीय मालकीच्या एका मालवाहू आगबोटीचे कप्तानाला बंगालच्या उपसागरात गनिमाच्या पाणबुडीचा ठाव ठिकाणा लागला. पण रेडिओ–टेलिफोन वापरण्याची बंदी असल्याने त्यासंबंधीचा तपशील नौदलास कळविणे, त्यानुसार नौदलाकडून ताबडतोब आवश्यकती हालचाल होणे, याला उशीर झाला. दरम्यान त्या कप्तानाने पाणबुडीचा वेध घेऊन तिला टक्कर देऊन चिरडण्याच्या (रॅमिंग) दृष्टीने पवित्रा घेतला. व्यापारी आगबोट बोजड व निःशस्त्र असल्याने, अनेक गोष्टींचा तारतम्याने विचार करून त्या कप्तानाने तो निर्णय घेऊन तसा पवित्रा घेईपर्यंत, जी काही दहा मिनिटे गेली, तेवढ्या वेळात ती पाणबुडी गडप झाली, ती झालीच. नंतरची शोधाशोध सुद्धा व्यर्थ ठरली.

भारतीय नौदलाची सारी ताकद अरबी समुद्रात एकवटण्यात आली होती. बंगालचा उपसागर व अंदमान निकोबार ही बगल (फ्लँक) असुरक्षित ठेवण्याचा धोका पत्करण्यावांचून गत्यंतर नव्हते. खरे सांगायचे तर अरबी समुद्राचा प्रचंड विस्तार आणि पश्चिम किनाऱ्यावरील सर्व बंदरे याचे संरक्षण करण्याचे दृष्टीने भारतीय नौदल तोकडेच पडले. कारण बंदरांच्या रक्षणाप्रमाणे व्यापारी आगबोटींच्या काफिल्याचे संरक्षण हीही मोठी जोखमीची कामगिरी असते.

भारतीय नौदल ताकदीपेक्षा संख्येने अपुरे होते. त्याचा पुरेपूर फायदा पाकिस्तानला मिळाला. म्हणूनच द्वारका व जामनगर बंदरावर भरदिवसा तोफा डागून त्याचे नुकसान करणे त्याना शक्य झाले. तसे घडण्यास इतरही काही कारणे होती. युद्धकाळात प्रारंभी सर्वच देशातून चुका घडतात. अतिउत्साहाचे भरात अंदाज चुकतात. मिळालेल्या माहितीची छाननी नीट होत नाही. झाली तर ती संबंधितापर्यंत लवकर पोहोचत नाही. तशातच आम्हाला तरी 'नौदल' या अर्थाने मोठ्या लढाईचा हा पहिलाच प्रसंग. कारणे काहीही असोत. द्वारका व जामनगरचे नुकसान व्हायचे ते झाले, हेही मान्य. पण जेथे इंग्लंडसारख्या शतकानुशतकांची नाविक परंपरा असलेल्या बलाढ्य राष्ट्राच्या नौदलासमुद्धा हिटलरने नॉर्वेच्या आक्रमणाचे वेळी फसवून 'नाविक' बंदरात सहा क्रूझर्सचा तांडा घुसविण्याचा मोह पाडला, आणि ती साही क्रुझर्स एका तासात रसातळाला गेली, तेथे आमच्या हातून असे काही घडले, तरीही ते "प्रेम आणि युद्ध यात सर्व काही क्षम्य असते." या भूमिकेतून जाणून घेतले पाहिजे, एवढेच आमचे म्हणणे आहे.

## द्वारकेवरील हल्ल्याचा सूड

द्वारका–जामनगर प्रकाराने आम्ही खरंच पेटलो. आणि गनिमाच्या युद्धनौकाना लढाईत खेचण्यासाठी अनेक खटपटी लटपटी केल्या. पण व्यर्थ. पाकिस्तानी नाविकाना याची जाणीव होती की "मॅन फॉर मॅन" भारतीय नौदल अत्याधुनिक नसूनहि तितकेच कडवे होते. म्हणूनच शेवटपर्यंत तो लपंडाव लपंडावच राहिला. अपवाद ठरले त 'गाझी' प्रकरण.

सप्टेंबर १९६५ मध्ये "बियास" आणि "बेटवा" ही फ्रिगेट्स नेहमीप्रमाणे दर्यावर गस्त घालीत होती. मुंबईपासून दीडशे सागरी मैलावर ती वावरत होती. त्यावेळी त्यांच्या वेध-यंत्राच्या पडद्यावर "गाझी" ही पाकिस्तानी पाणबुडी दिसली. त्यानी त्या पाणबुडीला बुडविण्यासाठी योग्य वेळी जलास्त्रांचा मारा केला. परंतु बहुधा अतिउत्साहाचे भरातच तो घाव गाझीच्या वर्मी बसूनही, ती जीव घेऊन पळून जाण्याइतकी धड राहिली. आणि जबर नुकसान झालेले असूनही "गाझीच्या" कप्तानाने तिला कराचीपर्यंत पाण्याखालून नेले. प्रचंड धोका पत्करूनही त्या नाविकानी आपले कौशल्य पणाला लावून "गाझी" सुखरूप नेली. धोका अशासाठी की तोपर्यंत "गाझी"च्या अस्तित्वाची तसेच ती जायबंदी झाल्याची माहिती सर्वांना कळविण्यात आली होती. त्याच भागातील काय, इतरत्र पसरलेल्या नौदल आगबोटी व विमानेही 'गाझी'ला पृष्ठभागावर आणण्यासाठी प्रयत्न करीत होती. निदान तिचा ठावठिकाणा लागला असता, तरीही पुढचे काम सोपे झाले असते. सारांश 'गाझी' निसटू शकली.



**गनिमाच्या विमानांचा वेध घेणाऱ्या तोफा डागल्या जात आहेत...**









## वरुणपुत्रांची गरुडभरारी

युद्धकाळातच काय पण शांततेच्या काळातही कराची-मुंबई ही थेट विमान वाहतूक समुद्रावरूनच होत असते. युद्ध सुरू झाल्यामुळे स्वाभाविकच भारतीय भूप्रदेशावरून उड्डाण करणे पाकिस्तानी वैमानिकांना शक्य नव्हते. त्यामुळे भारतीय शहरे व बंदरे यावर हल्ला करण्यासाठी, समुद्रावरून उड्डाण करण्या-वाचून त्यांना गत्यंतर नव्हते. दुश्मनाची ती विमाने आणि त्यांचे नौदल यांच्यात विघ्न निर्माण करण्याचे काम आम्ही पार पाडले. त्यांचे कित्येक गुप्त संदेश पकडून फोडण्यातही आम्ही यशस्वी झालो. दुश्मनाची विमाने आमच्या रडार्सनी कित्येक वेळा वेधली. पण आगबोटींच्या माऱ्याचे टप्प्यात घुसून हल्ला चढविण्याचे धाडस त्यांनी न केल्याने आमच्या तोफा सज्ज असूनही तशाच राहिल्या. सागरावरील जागत्या पहाऱ्यामुळे अरबी समुद्रात पाणसुरुंग पेर-णेही पाकिस्तानी नौदलास शक्य झाले नाही. फार काय मुंबईवर हल्ला करण्यासाठी आलेली पाकिस्तानी बाँबफेकी विमाने नौदल-लढाऊ आगबोटींच्या रडार्सनी टिपताक्षणी त्यांचा मागोवा घेऊन विमानविरोधी तोफाही डागण्यात आल्या. तेवढ्यानेच त्यांची हिंमत खचून ती परतली. त्या सप्टेंबर महिन्यात पाकिस्तानी वैमा-निकांनी निदान चार पाच वेळा तरी हल्ला चढविण्याचा प्रयत्न केला. पण प्रत्येक वेळी त्यांना माघारच घ्यावी लागली. मुंबई बंदर आणि परिसराचे संरक्षण म्हणजे नौदल आणि वायुसेना यांच्या उत्कृष्ट संयुक्त कार्यवाहीचे मौलिक उदाहरण होते म्हणा ना. मुंबईप्रमाणे कोचीनच्या नौदल केंद्रावरही गनिमी विमानांनी हल्ला चढविला होता. त्यांनी तेथे दोन बाँब्ज टाकले. पण सुदैवाने ते वाळूतच पडल्याने नुकसान मात्र झाले नाही. आणि त्यांचा मागोवा घेई घेईतो ती विमाने पळून गेली. पुन्हा मात्र त्यांनी तेथे बाँबहल्ल्याचा प्रयत्न केला नाही.

## गजबजलेली ऑपरेशन्स रूम

त्या काळात मुंबई येथे "मॅरिटाइम ऑपरेशन्स" ही नियंत्रण-यंत्रणा सुरू करण्यात आली होती. ज्या खोलीत ते काम चाले त्या खोलीचा बंदोबस्त अतिशय कडक होता. तेथे कामावर अस-लेले खलाशी व अधिकारी तेथून कधीच दूर जात नसत. कामाचे तास संपले की बाजूच्या एका खोलीत जाऊन विश्रांति, भोजन, चहा घेणे. परत वेळेवारी कामावर हजर. त्या मंडळींपैकी कित्ये-कांची कुटुंबे मुंबईलाच असूनही घरी जाण्याचा विचार सुद्धा त्यांच्या मनाला शिवला नाही. बाँबहल्ल्याचा इशारा मिळूनही ती मंडळी तेथून हलत नव्हती. ते संपूर्ण तीन चार आठवडे त्या मंडळींनी तेथेच घालविले. त्यामुळे अधिकारी व खलाशी यांच्या-तील सुप्त गुणावगुणही त्याच वेळी समजून आले. कानेकोपरे धासून गुळगुळीत झाले. अकार्यक्षमांना डिच्चू मिळाला. तडफदार लोकांची वाहवा झाली. 'ऑपरेशन्स रूम' स्टाफला चांगले, स्वादिष्ट गरम अन्नपाणी पुरविण्यात नौदलातील अधिकाऱ्यांच्या मायबहिणींनी कोणतीही कसर ठेवली नाही. एरव्ही लेफ्टनंटची किंवा लेफ्टनंट कमांडरची घरवाली म्हणजे केवढा रुबाब! काय मजाल आहे तिचा शब्द कोणी मोडेल? त्याची गच्छंति झालीच! पण तो प्रसंग सर्वस्वी निराळा होता. त्यामुळे सेंट्रीच्या हातात डबा दिला जाई. भारावलेली नजर एकदा सर्वत्र फिरे. मूड असला तर सेंट्रीशी एकादा प्रेमळ शब्द बोलले, नाहीतर सौभाग्याच्या रक्षणासाठी मंगळसूत्र, क्रूस, अंगठी, निदान हात जोडून, निदान मनातला मनात प्रार्थना करून ती मायपाऊली परत फिरे. दारी पतीची चिंता. घरी बछडी वाट पहात असलेली. कित्येकींना तर आपल्या स्वामींची ओळखही नीटशी पटावयाची होती. हळद अजूनही ओलीच होती. पण साऱ्या जणी धीरोदत्त, कर्तव्यपरायण बनल्या होत्या. आणि मुलकी नोकरवर्ग व कामगार? त्यांची तर पाठ थोपटावी तेवढी थोडीच.

## कामगार व कारकून यांनीहि हातभार लावला

नौदलाच्या विविध कार्यालयातील मुल्की स्त्री-पुरुष, कुमा-रिका, विवाहिता, प्रौढा, अबालवृद्ध कर्मचारी कधीही गैरहजर राहिले नाहीत, वेळ चुकविली नाही. हवाई हल्ल्याचे भोंगे वाजूनही ते टेबलावरून हटत नसत. रागावले तर म्हणत, जे तुमचे होईल तेच आमचे! एकात्मतेची ती जाणीव ती आदिशक्ती! तिचा साक्षात्कार घडून जीवन धन्य झाले. हिंदू, मुसलमान, पारशी ख्रिश्चन, अनेक भाषा बोलणारे, अनेक प्रकारचे भोजन घेणारे, भिन्न भिन्न सणवार पाळणारे ते सारे भारतीय बनले होते. अंत-र्बाह्य भारतीय बनले होते. 'ओव्हरटाइम' तसेच शिस्तीच्या बड-ग्याचे दडपणानेच ते घडले असे म्हणणे म्हणजे त्यांच्या राष्ट्र-भक्तीचा अवमान करणे होईल. कर्जत–कसारा–विरारपासून ती मंडळी येत.

गोदीतील कामगारांचे जीवन तर सर्वात अधिक खडतर, धोकादायक! १९४४ च्या स्फोटाची आठवण दररोज प्रत्येकाला होई. ती भेसूर आपत्ती ओढवू नये म्हणून मनोमनी ते प्रार्थना करीत. बंदरात चढणारा–उतरणारा माल अतिशय दक्षतेने हाता-ळला जाई. हजारो टन धान्य अहोरात्र उतरविले जात होते. बंदराच्या धक्यावर पसरलेल्या ढिगाऱ्यात काय नव्हते? संजी-वनी तसेच पाशुपत-अस्त्र दोन्हीही तेथे होते. एकच बाँब प्रलयास पुरेसा होता. पण त्या सर्वांवर मात करून तेथील कामगार नेहमीप्रमाणे कामाला येत. सकाळी पानतंबाकूची देवाण–घेवाण, दुपारी थट्टा मस्करी करीत करीत भाकरीचा फन्ना, मधल्या वेळी मुकादमाची नाहीतर साहेबाची कधी खुशामत तर कधी टिंगल करूनही त्याच्याकडून लाटलेला चहा; युनियनचे पुढारी येत. पाठीवरून शाबासकीचा हात फिरे. की कापलाच चा–पाण्याला. पण ती देवाणघेवाण हक्काची, प्रेमाची, कर्तव्यनिष्ठेतून निर्माण झाली होती.

एरव्हीच्या काळात मुकादम टॅलिक्लार्क ओव्हरसियर, टग-पायलट म्हणजे काळ-महाकाळ. परस्परांचा परस्परांशी तसाच मजुरांशी उभा दावा. आयला न मायलाशिवाय बात नाय. एकादे दिवशी बाचाबाची, हाणामारी नाही झाली तर दिवस वंगाळ वाटावयाचा. पण त्या महिन्यात ते सारे लोपले होते. मुकादम वगैरेंची मग्रुरी थांबली होती. मजुरांच्या धमनीतील रक्त तापलेलेच होते. पण रोख वेगळा होता. शत्रूचे नरडे आवळण्यासाठी ते शिवशिवत होते. त्या इर्षेने सारे कामावर तुटून पडत होते. म्हणूनच बंदरातील सर्व कामे सुरळीत चालू राहिली. नौदलही अल्पस्वल्प कामगिरी करू शकले.

## दिल की लगी लगीच राहिली

पण, दिल की लगी लगीच, राहिली आणि आम्हाला नाइला-जाने आमच्या तोफांच्या तोंडावर पुन्हा मुसक्या चढवाव्या लागल्या. नशीब–दुसरे काय? तथापी एक फायदा जरूर झाला. नौदलाच्या तुटपुंज्या सामर्थ्याची स्पष्ट कल्पना राज्यकर्त्यांना, तसेच शासन-यंत्रणेलाही आली. नौदलाकडे दुर्लक्ष केले तर आम्ही ठार होऊ हे पटले नि त्यातूनच नवीन योजनांनी आकार घेतला. म्हणूनच भारत–पाकिस्तान संघर्षाला मी रंगीत तालीम म्हटले आहे.

●●●






**अवघे ७३३ टन वजनाच्या 'बंगाल' या भारतीय युद्धनौकेने दुसऱ्या महायुद्धात ब्रह्मदेशच्या सागरी सीमेत घुसलेल्या आठ व दहा हजार टन वजनांच्या दोन जपानी युद्धनौकांवर हल्ला चढवून त्यापैकी एकीला समुद्रतळ दाखविला. तर दुसरी जायबंदी होऊन केकाटत सुटली......**

**भारतीय नौदल ध्वजाधिकारी**

## रिअर ॲडमिरल एस. एम. नंदा

**विशिष्ट सेवा पदक (प्रथम श्रेणी)**

**यानी घडविलेले भारतीय आरमाराच्या पराक्रमाचे दिव्य दर्शन–! उद्बोधक तितकेच मनोरंजक–!**

**भारतीय** नौदलाने दुसऱ्या महायुद्धात इराणचे आखात, तांबडा समुद्र आणि हिंदी–महासागर या तीन भिन्न भिन्न ठिकाणी सर्वस्वी वेगळ्या वातावरणातही पराक्रम गाजविला. अवघ्या सातशेतेहेतीस टन वजनाच्या 'बंगाल'ने ब्रह्मदेशच्या सागरी सीमेंत घुसलेल्या दोन जपानी युद्धनौकांवर हल्ला चढविला. त्यापैकी एक होती आठ हजार टनांची तर दुसरी दहा हजार टन वजनाची. त्यातील एक युद्धनौका 'बंगाल'ने बुडविली, तर दुसरी जायबंदी होऊन केकाटत पळत सुटली. स्वातंत्र्योत्तर काळात गोमंतक–विमोचन आणि १९६५ मधील भारत-पाकिस्तान लढाईतही नौदलाने आपली कामगिरी यथाशक्ति पार पाडली. पण हे झाले कसे?

दर्यासारंग कान्होजी आंग्रेंचा सत्यानाश झाल्याने मराठी आरमार–खरे म्हणजे भारतीय आरमारच नष्ट झाले. ईस्ट इंडिया कंपनीच्या राजवटीत मुंबई येथे वाडिया बंधूनी बांधलेली गलबते सीता समिंदरांची सफर करू लागली. ती इतकी उत्कृष्ट ठरली की इंग्लंडमधले जहाज कारखाने बंद पडले. शेवटी वाडियांच्या त्या कर्तृत्वावरही इंग्रजानी घाव घातला. आणि जहाज बांधणीचीही परंपरा खंडित झाली. सुदैवाने यंदा मुंबईच्या माजगाव डॉक्स लि. या सरकारी आगबोट कारखान्यात युद्धनौका बांधणीस प्रारंभ झाला आहे. तीनशे वर्षांची खंडित परंपरा परत जुळली, हा काळाने उगविलेला सूडच म्हणावयास हवे. हे सर्व जरी खरे असले तरी ब्रिटिशांनी व्यापारानिमित्त भारतात पाऊल ठेवल्यानंतर त्यांच्या व्यापारी गलबताचे संरक्षण आणि कालांतराने साम्राज्याचेही रक्षणासाठी ब्रिटीश नौदलाचे ताफे भारतीय महासागरात, अरबी समुद्रात तसेच बंगालच्या उपसागरात ठेवणे सत्ताधारी ब्रिटीशाना कोणत्याही दृष्टीने परवडणारे नव्हते. त्यांतूनच विद्यमान भारतीय नौदलाचा प्रारंभ व विकास घडला.

### भारतीय नौदलाची उभारणी

पाच सप्टेंबर १६१२ या दिवशी ईस्ट इंडिया कंपनीच्या लढाऊ गलबतांचा पहिला काफिला सुरत बंदराच्या धक्क्यास लागला. 'दि ऑनरेबल ईस्ट इंडिया मरीन' असे नाव त्याला देण्यात आले. आपल्या नौदलाचे ते पहिले-वहिले बारसे. काही काळानंतर ते नाव बदलून 'दि बॉंबे मरिन्स' हे सुटसुटीत नामाभिधान मिळाले. १९१४–१९१८ च्या पहिल्या महायुद्धाचे वेळी नौदलाचे तिसऱ्यांदा बारसे होऊन ते 'रॉयल इंडियन मरीन' बनले. त्या महायुद्धाचे वेळी 'हार्डिज' 'नॉर्थब्रूक' 'मिंटो' व 'डफरीन' या नौकांनी तांबडा समुद्र, सुवेझ कालवा, इराक, इजिप्त आफ्रिकेचा पूर्व किनारा या टापूत कामगिरी बजाविली. दुसरे महायुद्ध (१९३९–४५) सुरू होण्याच्या आगेमागे 'बॉंबे मरीन्स'चे रूपांतर 'दि रॉयल इंडियन नेव्ही'त झाले. १९५० साली भारत प्रजासत्ताक बनला आणि 'रॉयल' हे उपपद कायमचेच सुटले.





अनुक्रमणिका

## दोन महायुद्धांतील विकास

पहिल्या महायुद्धाचे वेळी भारतीय नौदलात जेमतेम शंभर अधिकारी व हजारएक खलाशी होते. सर्व अधिकारी गोरेच होते. पण त्यापैकी पुष्कळानी स्वेच्छेने भारतीय नौदलाची नोकरी स्वीकारली होती. दुसऱ्या महायुद्धाचे वेळी मधल्या श्रेणीत का होईना पण थोडेफार भारतीय अधिकारी होते. १९५० नंतर मात्र जवळ जवळ सर्वच अधिकारी भारतीयच आहेत. १९३९-४५च्या युद्धास प्रारंभ झाला तेव्हा 'इंडस' 'हिंदुस्तान', 'कॉर्नवॉलिस', 'लॉरेन्स' 'क्लाईव्ह', पठाण, मद्रास व 'इन्व्हेस्टिगेटर' या विविध प्रकारच्या युद्धनौका भारतीय नौदलात होत्या. पाणसुरुंग पेरणे–काढणे, संरक्षण देणे, गस्त घालणे, प्रसंगी हल्लाही करणे, सैन्य वाहतूक इत्यादि सर्व प्रकारची कामगिरी पार पाडणाऱ्या त्या आगबोटी होत्या. प्रत्यक्ष युद्धकाळात 'सतलज', 'जमुना', 'कृष्णा', 'कावेरी', 'नर्मदा' व 'गोदावरी' यांची भर पडली. त्या युद्धाचे अखेरीस भारतीय नौदलात छोटचा मोठचा मिळून एकशेसतरा बोटी होत्या. तथापि इतके होऊनही गस्त घालणे व व्यापारी आगबोटींना संरक्षण देणे हेच काम फार करून भारतीय नौदलाच्या वाटचाला आले. इतकेच काय पण जपानला हरविण्यासाठी सिलोनमध्ये "दक्षिण पूर्व–आशिया–कमांड" स्थापन करण्यात आली. ॲडमिरल लुई मौंटबॅटनसारखा शाही तसेच कर्तबगार दर्यासारंग तेथून हालचाली करू लागला. तरीही भारतीय नौदलाचे काम दुय्यम किंबहुना सहाय्यक (ऑक्झिलिअरी) स्वरुपाचेच राहिले.




दरम्यान दक्षिण भारतात मंडपम् येथे नौसेना–केंद्रही स्थापन करण्यात आले. तथापि कनिष्ठ आणि दुय्यम श्रेणीतील जे काही भारतीय अधिकारी होते त्यांची मजल फार तर मध्यम प्रतीच्या अधिकारपदापर्यंतच जाऊ शकत होती. एकाद्या बोटीचे कप्तानपद हाच महत्वाकांक्षेची इतिश्री होती.

## नौदल बंड आणि स्वातंत्र्य

महायुद्धात विजयी झाल्यानंतर भारतीय नौदल मोडण्याचा घाट ब्रिटीशानी घातला होता. त्यामुळे हजारो नाविकांपुढे नोकरीचाही प्रश्न नाही म्हटले तरी उभा होता. पण नौदलबंडाचे एकमेव कारण मात्र ते नव्हते. त्याला आणखीही दोन कारणे होती. एकतर अधिकारी गोरे होते. त्यांची उर्मट वागणूक भारतीय नाविकच काय पण अधिकाऱ्यानाही सलत होती. दुसरे नौदलातील अन्नही निकृष्ट होते. तसेच शाही नौदलातील भोजन पद्धत भारतीय नौदलास लागू केलेली नव्हती. शाही आरमारात खलाशापासून तो नौदल–प्रमुखापर्यंत सर्वांच्याच भोजनाची जबाबदारी सरकार घेते. त्यामुळे पदार्थ वेगवेगळे शिजवूनही अन्नाची रुची एकच असते. या उलट आपल्या नौदलात फक्त नॉन कमिशन्ड हुद्यापर्यंतच्या नाविकांच्या जेवणखाणाची जबाबदारी सरकारवर असते. साहजिकच हजारो नाविकांच्या विविध प्रकारच्या भोजन पद्धती विचारात घेऊन सर्व सामान्य मेनू ठरविला जातो. आणि त्यातून रुचिपालट म्हणून वेगवेगळे पदार्थ त्याना मिळतात.

याउलट पेटी–ऑफिसरपासून चढत्या श्रेणीने सर्व वरिष्ठ अधिकाऱ्यांकडून ठराविक हिशोबाने भोजनाचा खर्च पगारातून वसूल होतो. त्याला मेस–अलौन्स म्हणतात. कागदोपत्रीच काय ती रक्कम दाखविली जाते, पण प्रत्यक्षात–त्यांच्या जेवण खाणासाठी ती संबंधित विभागाकडून खर्च होते. दर खलाशासाठी येणाऱ्या मासिक अन्नखर्चापेक्षा ती रक्कम केव्हाही अधिक असते. म्हणून त्या लोकांचे जेवण आणि खाणेही चांगल्या दर्जाचे असते. ती पद्धत बदलली पाहिजे असे माझे व्यक्तिगत मत आहे. असो.

तर जेवणातील तो फरकही सर्वांना खुपत होता. शिवाय इतर दैनंदिन गरजांकडेही नीटसे लक्ष दिले जात नव्हते. या साऱ्यांचा ताप भारतीय अधिकाऱ्यानाच अधिक होत असे. युद्धोत्तर पुनर्वसनाचीही सोय शास्त्रोक्त पद्धतीने झालेली नव्हती. मुल्की जीवनही ढवळून निघत होते. अशा अनेक कारणानी बंड झाले. त्या बंडाला भारतीय अधिकाऱ्यांची सहानुभूती होती. त्यातच आझाद हिंद फौजेच्या खटल्यातून परकीय सरकारला आगामी क्रांतीचे दर्शन घडले. अशा रीतीने स्वातंत्र्य लवकर मिळण्यासाठी ज्या घटना महत्त्वाच्या ठरल्या त्यात नौदल व वायुसेनेचे बंड यांचाही समावेश आहे.

## फाळणीच्या वेळची परिस्थिती

नौदल बंडामुळे बोध घेऊन ब्रिटीश सरकारने एक चौकशी मंडळ नेमले. "दिल्ली कमिशन" या नावाने ते प्रसिद्ध आहे.

अनुक्रमणिका




युद्धोत्तर नौदलाचा आकार–विस्तार आणि उपयोग या दृष्टीने त्या कमिशनने त्याच्या मर्यादित कक्षेत बसणारी योजना सादर केली. युद्धोत्तर नौदल विकासाचा तो पहिला टप्पा ठरला.

दरम्यान फाळणी होऊन आपण स्वतंत्र बनलो. त्याची जबर किंमत नौदलासही मोजावी लागली. फाळणीमुळे अविभक्त नौदलातील जवळजवळ एक तृतियांश साधनसामग्री पाकिस्तानला गेली. प्रत्यक्ष युद्धनौका, प्रशिक्षण नौका तर गेल्याच. तसेच काही प्रशासकीय विभागही द्यावे लागले. तसेच मनुष्यबळाबाबतही नवनिर्मित हिंद आणि पाकिस्तानी नौदलास फटका बसला. कारण अविभक्त बंगालच्या चितगाव, डाका इत्यादि जिल्ह्यातील नाविक यांत्रिक विभागात, इंजिनरूम, तोफखाना वगैरे बाबतीत प्रवीण होते. तर पश्चिम किनाऱ्यावरील लोकानी इतर क्षेत्रात नाव कमावले होते. बोटीचे दैनंदिन व्यवहार सांभाळणाऱ्या अधिकाऱ्यात (त्याना डेक ऑफिसर्स म्हणतात) त्यांचा हात धरणारे कोणी नव्हते. धार्मिक अधिष्ठानावरील फाळणीमुळे भारतीय तसेच पाकिस्तानी नौदलातील मनुष्यबळही अशा प्रकारे विषम बनले. एका शब्दात सारा मांड पुन्हा मांडावयाचा होता. पण त्या काळचा ढगाला एक रुपेरी कडाही होती. वरिष्ठ जागांवरील गोऱ्यांची मक्तेदारी सुटल्याने कर्तृत्वाला आणि, बढतीला पुरेपूर वाव मिळाला. आणि त्यावेळी नव्याने स्थापन झालेल्या नौदल–केंद्रीय कार्यालयाने बजाविलेल्या कामगिरीला तोड नाही.

## 'दिल्ली' आणि इतर युद्धनौकांची खरेदी

एकीकडे स्थिरस्थावर करीत असतानाच, दुसरीकडे नवनवीन आगबोटी विकत घेण्याचे दृष्टीने पावले पडू लागली. एच. एम. एस. ॲचिलस ही युद्धनौका (क्रुझर) विकत घेण्यात आली. आणि तिचे बारसे 'दिल्ली' असे झाले. १९४७ मध्ये आपण स्वतंत्र झालो नि उण्यापुऱ्या वर्षा दीड वर्षातच 'दिल्ली' ही स्वतंत्र भारताची पहिली ध्वजनौका (फ्लॅगशिप–सर्वोच्च वरिष्ठ अधिकाऱ्याचा स्वतंत्र ध्वज लावणारी नौका) बनली. पहिले भारतीय नौदल प्रमुख व्हाइस–ॲडमिरल रामदास कटारी हे त्यावेळी 'दिल्ली'चे एक्झिक्युटिव्ह ऑफिसर व उपप्रमुख होते. 'दिल्ली'बरोबर तीन विनाशिकाही विकत घेण्यात आल्या. तो व्यवहार १९४९मध्ये पूर्ण झाला.

'राजपूत' 'राणा' आणि 'रणजित' ही विनाशिकांची दुसरी तुकडी १९५० साली विकत घेण्यात आली. 'गोदावरी' 'गोमती' आणि 'गंगा' या विनाशिका ब्रिटीशांकडून प्रारंभी उसन्या आणण्यात आल्या होल्या. त्या १९५३ साली विकत घेण्यात आल्या. 'म्हैसूर' ही तत्कालीन दुसरी ध्वजनौका १९५७ मध्ये भारतीय नौदलात आली. १९६०–६१ मधे 'विक्रांत' पण आली. आणि तेव्हापासून 'विक्रांत' हीच नौदलाची ध्वजनौका आहे. गोमंतक विमोचनानंतर नौदलातील वैमानिक विभागाचे (फ्लीट एअर आर्म) मुख्य केंद्र पणजी येथे 'गोमंतक' या नावाने स्थापन झाले. अशा तऱ्हेने नौदल विकासाचा दुसरा टप्पा पार पडला.

आपल्या पहिल्या ध्वजनौकेने (दिल्ली) द. अमेरिकेत ब्युनॉस आयर्सच्या टापूत 'ॲडमिरल ग्राफ्स्पी' या प्रचंड जर्मन बॅटलशिपला पकडून बुडविण्याच्या कामी प्रत्यक्ष कामगिरी बजाविली होती. त्यावेळी ती होती एच. एम. एस. 'ॲचिलिस'. ग्राफ्स्पीची जबर मोडतोड होऊन ती पळाली आणि नंतर तिच्या कप्तानाने तिचा विध्वंस केला. ती एक स्वतंत्रच कहाणी आहे.

## नवीन उपक्रम, नवी क्षितीजे

युद्धनौकांची बांधणी सुरू झाली आहेच. शस्त्रास्त्रे व दारुगोळा याहीबाबत आपले नौदल बरेचसे स्वावलंबी आहे. आजमित्तीस अभाव आहे तो पाणबुड्यांचा. कारण पाणबुडीची चिंता न करणारा दर्यासारंग अद्यापी उगवावयाचा आहे. पाणबुड्या चालविण्याचे शिक्षण देण्याची योजना कैक वर्षांपासून सुरू आहेच. पाणबुडी विकत घेणे व तिचा सांभाळ हाही एका स्वतंत्र लेखाचाच विषय बनेल. तथापी आज ना उद्या आपल्याकडेही पाणबुड्यांचा ताफा सज्ज होईल. ते झाले की मगच नौदल प्रौढावस्थेत आले असे म्हणता येईल.

घटकाभर असे धरले की पाणबुड्या घेण्यास आपल्याकडे पैसाही आहे. तरीसुद्धा भारत ही एक प्रभावी सागरी सत्ता बनू नये, ही काळजी वाहणारे अन्य समृद्ध देश आपणास पाणबुड्या विकत देण्यास तयार आहेतच असेही नाही. भारतीय नौदल बलाढ्य बनले तर सुदूरपूर्व तसेच दक्षिणपूर्व आशियातील सध्याचे परकीय वर्चस्व नष्ट होईल. त्यांच्या दृष्टीने त्यात नुकसान आहे. स्वाभाविकच ते आपला राष्ट्रीय स्वार्थ आधी बघणार.

"या दृष्टीने विचार करता शस्त्रास्त्रे विकत घेऊन संरक्षक दलांचे सामर्थ्य वाढविण्यापेक्षा त्यांचे उत्पादन भारतातच करावयाचा ऐतिहासिक निर्णय कै. पंडित जवाहरलाल नेहरू यानी सर्व दल प्रमुखांशी चर्चा करून, त्यांची मते जाणून, नंतर घेतला होता. तोच आता आपणास तारक ठरत आहे. ही गोष्ट १९६५ च्या लढाईने सिद्ध झाली आहे."

जगातील अन्य राष्ट्रांचा भारतीय नौदलाच्या सामर्थ्याकडे बघण्याचा दृष्टिकोण सांगितला. आता पाकिस्तानकडे–आपल्या शेजाऱ्याकडे जरा बघूया. एकतर पाकिस्तान सर्वच दृष्टीने छोटे आहे. दुसरे कम्युनिझमशी मैत्री आणि विरोधही–अशी दुहेरी कसरत त्याने सुरू केली आहे. तिसरे पूर्व आणि पश्चिम पाकिस्तानातील हजारो मैलांचे अंतर. या तीन्ही घटकांचा साकल्याने विचार करता पाकिस्तानला अस्त्र–शस्त्र पुरवठा केल्यास तो महाग पडणार नाही असा त्या साह्यकर्त्यांचा कयास आहे. म्हणूनच सरळ किंवा आड मार्गानेही पाश्चिमात्य राष्ट्रे त्याला शस्त्रास्त्रे पुरवीत आहेत. पण त्यातील धोकेही ते जाणून नाहीत असे मात्र नाही. सारांश, हिंदी महासागर आणि भूमध्य सागरातील पाश्चिमात्य सागरी अधिपत्य लयास गेले आहे. ती पोकळी भरून काढणे सर्व दृष्टीने भारताच्या जीवनमरणाची बाब ठरू शकेल. म्हणूनच आपले नाविक सामर्थ्य वाढवून ते टिकविलेही पाहिजे.

●●●









**डेकवर शांतता पसरली होती. जयंताने रीटाला एकनिष्ठ प्रेमाचे महत्व पटवून दिले होते. प्रीतीच्या त्या बंधनात, तो सुखाने प्रतिक्षा करीत होता, मीलनाची........**



—शैलजा मंडपे

# तू असा जवळी राहा....

**हॅलो!** कप्टन जयंत! अजून येथेच? येणार नं आज? जरा लंडन घुमूया, कॅप्टन स्वामीनं विचारलं.

आणि दोन महिने त्रासलेली शरीरं जरा खाऊनपिऊन मस्त करू यार——कॅप्टन सोमलवारनं पुस्ती जोडली.

हं! एक हुंकार टाकून जयंत उद्गारला, "नको इथच थांबतो मी! पुष्कळ दिवस रहायचं आहे इथं. इथली मजा लुटायला."

अरे यार! दिवस जातील झटकन निघून. मग आहेच सागर आणि आपण. चलो यार. आज रात्री 'मेलबोर्न' हॉटेलमध्ये डान्स आहे.

"मग तर मी अवश्य इथेच थांबणार. या निसर्गातील शांततेत हिंडणार मनसोक्त. हे वातावरण बघा कसं शांत, प्रसन्न आहे.

आणि त्याच्या खांद्याला पकडत कॅप्टन सोमलवार म्हणाला, "अरे जयंत! किती दिवसांनी हा किनारा मिळाला आहे. दोन दिवसांची दुनिया न्याहाळणार नाहीस. तर काय करायचं ठरवलं आहेस. सागरात असेतोपर्यंत ही धुंदी, उन्माद साठवून ठेवायचा आणि किनाऱ्याला लागलं कीं मनमुराद लुटावयाचा तो."

मोठमोठ्यानं हंसण्याचे आवाज कानी पडल्यावर जयंतनं मागे वळून पाहिलं. कॅप्टन किशोर, कॅप्टन मंत्री, कर्णिक, कॅप्टन माथूर, शेख सारी मित्रमंडळी येत होती. सुटाबुटात. त्याला पहाताच सारी थबकली. आणि माथूर म्हणाला—

"चलो यार! मजाक उडायेंगे हम आज! बहोत देर थांबावं लागलं का? सॉरी!"

जयंतचं तेथून हलण्याचं ठिकाण न दिसण्याने सर्वांनीच त्याला बरोबर चलण्याचा आग्रह केला. आणि शेवटी तो येत नाहींसा पाहून साऱ्यांनी त्याला निरोप दिला. जाताना किशोर म्हणाला, डोळा मारत—

"यार! जरा मौज करतो. वाट पाहू नकोस, खाना पिना और सबकुछ आज बाहेरच उरकतो. येऊ आता पहाटेच्या सुमारास".

सारी मित्रमंडळी निघून गेली होती. संधिप्रकाशातील गहिरे रंग न्याहाळत जयंत पोर्टवर फिरत होता. इतक्यात, "गुड इव्हिनिंग कॅप्टन" या नाजूक शब्दानी तो भानावर आला आणि हसून त्यानं प्रतिसाद केला.

"काय काम आहे आपल?" जयंतने विचारले.

सहा फूट उंचीच्या गोऱ्यापान जयंतला आपल्या काळ्याभोर डोळ्यांनी न्याहाळत ती उद्गारली, "माझ नाव रीटा. तुम्ही कॅप्टन राजसिंहाला ओळखता?"

"हो"

"त्यानें इथं मला बोलावलं सहा वाजता" मनगटातील चिमुकल्या घड्याळाकडे पहात ती म्हणाली.

"मग? कांही निरोप द्यायचा आहे का?"

तोंडाचा चंबू करीत ती उद्गारली, "निरोप कसला द्यायचा? त्यानें मला जेवायचं आमंत्रण दिलं होतं."

"ओ सॉरी !"

"तुमची हरकत नसेल तर येता का जेवायला माझ्याबरोबर मी निघालोच आता."

'वेलाशक' म्हणून रीटा जयंतबरोबर चालू लागली. आठ साडेआठचा सुमार! लंडनमधील सारे रस्ते रहदारीनें फुलले होते. मेलबोर्न हॉटेलपाशी आल्यावर रीटाने नेहमीच्या सरावाने कॅप्टन जयंतच्या हातात हात अडकविले व तिनें हॉटेलमध्ये प्रवेश केला. तेच हॉटेल जवळ होते. जयंतच्या मित्राने त्याच्याकडे पाहिले व टेबलावरील ड्रिंकचा पेला उचलून त्याचे स्वागत केले. फॅशन-शोमध्ये असल्याप्रमाणे रीटा सजली होती. मुरकत होती. आपले सडसडीत बांधेसूद शरीर लीलया तोलीत मुरकत मुरकत कांही-तरी हितगूज त्याच्याशी करीत होती.

क्षणभर टेबलावरील व्हिस्कीचे पेले एकमेकाना न्याहाळत होते. पेल्यातील पेयाचा गरीमा रीटाच्या गोऱ्यापान चेहेऱ्यावर पसरला होता. सिगरेटची वलये सोडीत जयंत मात्र आपल्याच विचारात गुंग झाला होता. हलकेच रीटाला अभिवादन करून पेला जयंतनं ओठाशी नेला. उग्र सुगंधानं, गहिऱ्या सौंदर्यानं, आसक्तीच्या कटाक्षानं आणि सावज सांपडल्याच्या समाधानानं तो आसमंत दरवळला होता. इतक्यात संगीत सुरू झालं आणि मदिरेनं आणलेल्या प्रेमाच्या धुंदीतील त्या जोडया नृत्य करण्यास उठल्या. संगीताच्या संथ सुरावर धुंद पावल पडत होती. नृत्य करता करता कुणी कुणाशी हितगूज करीत होते तर कुणी अधरामृताचा आस्वाद घेत होते. रीटानं जयंतकडं सस्मित दृष्टीने पाहिलं. तिचा भाव ओळखून जयंतनं तुटकपणे थँक्स म्हटलं आणि तो कुठल्याशा विचारात बाहेर आला. त्याच तंद्रित त्याची पावलं बोटीकडे वळली.

दिवस जात होते. एक दिवस पुन्हा संध्याकाळी रीटानं जयंताला पोर्टवरच गांठल आणि.....

"त्यादिवशी तुम्ही न जेवताच परत आलात. तब्येत चांगली नव्हती का" संभाषणाचा धागा शोधण्यासाठी तिने प्रश्न केला.

"छे! वेगळ्याच आठवणी झाल्या मात्र. म्हणून उठून आलो! धुंद वातावरण मला नकोसं झालं मनातील आठवणींच्या काहूरानं"

"ओ! मला वाटले की, माझा सहवास कंटाळवाणा वाटला की काय?"

"निश्चित नाही. तुमच्या सहवासात कंटाळा येण्याचे कारण नाही."

दररोजच्या संभाषणातून जयंतचा सहवास रीटाला मिळत असून सुद्धा जवळीक साधत नव्हती याचीच तिला हुरहूर वाटत होती. खलाशांविषयीचा आजपर्यंतचा तिचा अनुभव कांही वेग-ळाच होता. आताचा प्रकार मात्र वेगळा होता. साहजिकच हे सावज तिच्या जीवाशी खेळत होतं. तिच्या अहंकाराला ही जाणीव झाली. म्हणूनच जवळीक करण्याची संधी जाणून बुजून ती आणीत होती. कधी जेवायला तर कधी गप्पागोष्टी करायला ती जयंतला भेटत होती......दोन तीन वेळा डेकवरील करम-णुकीच्या कार्यक्रमानाही ती गेली पण जयंतच्या ठायी आसक्तीचा लवलेशहि नव्हता. तिला आपल्या सौंदर्याचा जो विलक्षण अभि-मान होता त्यानंच हार खाल्ली होती.

नव्या वर्षांची नवी रात्र डेकवर थाटात आली. साऱ्यांच्या मैत्रिणी आल्या होत्या. ड्रिंकचे पेले रिकामे होत होते. सिगारेटच्या धुराची वलये हास्याच्या लकेरीत विरत होती. डेकवरील रोषणाई आणखीच उन्माद निर्माण करीत होती. ऑर्केस्ट्रा सुरू झाला. जराशानं जयंत उठून मोकळ्या दूर डेकवर गर्दीपासून आला. रीटाचं कार्यक्रमावरील लक्ष उडालं. जयंतचा पाठलागच तिला करायचा होता.

डेकवर जयंत खुर्चीवर बसला होता. टेबलावर व्हिस्कीची बाटली, ग्लास, थोडी चीज बिस्कीटं होती. आणि जवळच टेबला-वर त्याचा आवडता टेपरेकॉर्डर होता. सिगारेटची वलयं हवेत सोडीत विचारात गुरफटला होता. त्याची सारी हालचाल न्याहा-ळीत होती रीटा. जवळ येऊन तिनं विचारलं—

"कॅप्टन! आज झालय काय तुम्हाला?"

त्याच्या विमनस्क मनःस्थितीचा तिला अर्थच लागत नव्हता. असं असूनहि जयंतपासून दूर रहावं असं मात्र तिला वाटत नव्हते. एक रात्र तरी त्याच्या सान्निध्यात रमायला मिळावे अशी तिची



आत्यंतिक इच्छा होती. त्याच इच्छेनं तिला आता पुरती भारावून टाकलं होतं. दिवसरात्र जयंतचे विचार. तिला दुसरा छंद नव्हता.

"कांही झालं नाही. पण गर्दीत माझं मन कधीच रमत नाही." अगदी सहजगत्या जयंतनं उत्तर दिलं.

"मग एकटेच कां निघून आलात? मीहि आले असते तुमच्या-बरोबर. हातात हात घालून हिंडले असते या मुख्य परिसरात!" जवळीकेन रीटा बोलत होती.

"पण मला एकट्यालाच हिंडायचं होतं."

"या सुंदर वातावरणात एकट्यान कसं हिंडावं?"

"मी एकटा नसल्यानं मला एकाकीपणा कधीच बोचत नाही."

"ओ आयसी! म्हणजे मनात कुणाचं तरी स्मरण आणि ती व्यक्ति प्रत्यक्ष न भेटल्यानं केवळ कल्पनेनंच तिला डोळ्या-समोर उभी करायची! "

"छे."

"म्हणूनच तुम्ही मला आवडलात अगदी प्रथमदर्शनी. नाहीतर इतर पुरुष!"

"आपण जाऊया परत किनाऱ्यावर. आज खास पार्टी आहे 'ड्रेक्स'मध्ये," त्यावर जयंत एकदम उद्गारला.

"छे छे! आज मी इथून कुठेहि जाणार नाही. माझ्या गीताचा वाढदिवस आहे. तिला माझं पत्र मिळालं असणार. किती वेळा तिनं वाचलं असेल पत्र कुणास ठाऊक. खूप खुषीत असेल आज."

"गीता?" रीटाच्या कपाळावर आठ्या उमटल्या.

"होय. माझी वाग्दत्त वधू! खूप छान आहे. आहे सावळी पण भारी मोहक. बोलते इतकी गोड की सारखं तिनं बोलतच रहावं असं वाटतं."

"वाग्दत्त वधू. हँ म्हणजे अजून लग्नाच्या बंधनात काही तुम्ही अडकलेला नाहीत. बाकी, ते बंधन मानण्यावर आहे म्हणा. मला स्वतःला कुठल्याहि प्रकारची बंधनं मान्य नाहीत."

"पण आमची संस्कृति फार वेगळी आहे." जयंतनं तिच्याच सुरात उत्तर दिलं.

"पण एकाद्या स्त्रीला विशिष्ट पुरुषाविषयी आसक्ति वाटल्यावर ती त्या पुरुषानं पुरविणं यात कसला आला आहे विश्वासघात? आणि तुम्ही हजारो मैल तिच्यापासून दूर. आणि पुन्हा मी कांही तुम्हाला कायमचं माझ्या जाळ्यात गुंतवून ठेवणार नाही. मला स्वतःलाच तसं बंधन नको आहे." 'रीटा थोड्याशा अहंकारानं म्हणाली. तितक्याच शांतपणे जयंत म्हणाला "एकनिष्ठ रहाणेच मला आवडते. म्हणून तर मला गीताशिवाय कोणीहि दिसत नाही. सुचत नाही. आमची संस्कृति', आमचे पुराणग्रंथ याच तत्वाची जपणूक करून आले आहेत."

"माझा त्या तत्वज्ञानावर मुळीच विश्वास नाही. भारतीय संस्कृतीशी माझाहि खूपसा निकटचा सहवास आला आहे. आपल्या सोयीप्रमाणे त्या संस्कृतीला वळविता येतं. इतकी लवचिक आहे ती"

"कशावरून?" रीटाच्या युक्तिवादाची गंमत वाटून जयंतनं तिला प्रश्न टाकला.

अहो ती इतकी सोयीस्कर नसती तर तुमच्या पुराणात देवाच्या संगाने स्त्रियांनी पुत्रप्राप्ति करून घेतलीच नसती. संग करूनहि कौमार्य कायम रहावे व ते बदनाम होऊ नये म्हणून धुके निर्माण केल्याचाही उल्लेख त्यात आहे, असे मी ऐकले आहे. पण माझ्या प्रियकरा या डेकवर त्याचीही जरुरी नाही. निसर्गाने आपल्यासाठीच हे धुक्याचं पटल निर्माण केलं आहे. कां आता अंत पहातोस माझा? भावनाविवश होऊन रीटा बोलत होती. आणि जयंत शांतपणे सिगरेट ओढीत होता.

'अग, नियमाना असे अपवाद निघाले म्हणजे, सारे नियम संपुष्टात आणावयाचे की काय?—'

"अहो पण विश्वासघात होतो हे समजायला व मग त्या व्यक्तीला झालेलं दुःख पहायला ती व्यक्ति जवळ हवी नं?" रीटाला उत्तर देण्यासाठी जयंतनं झटकन खिशातून डायरी काढली व गीताचा त्यातील फोटो दाखवीत म्हटलं–

"ही बघ या क्षणाला माझी हृदयस्वामीनी माझ्याजवळ आहे. आणि निश्चित मनाने तुझं माझं संभाषण ऐकते आहे. चेहेऱ्यावरील भाव पाहिलेस किती निरागस आहेत ते. डोळे बघ. माझावरील प्रेमाने भारावलेले आहेत. विश्वास ओसंडतो आहे त्यातून. हे प्रेम विश्वास तुझ्या सहवासात दडला गेला तर ती काय म्हणल?"

म्हणायला ती कशाला येथे इथं! सारा कल्पनेचा खेळ. त्यातून निर्माण झालेले शब्द म्हणजे पाण्यावरचे बुडबुडे. ते काय खरे मानायचे? "

"कल्पना?" जयंतन हंसत विचारलं.

अग, गीता जशी माझ्याजवळ आहे तसा तिचा आवाजहि माझ्याभोंवती पिंगा घालीत असतो. थांब एक क्षणभर हं असं म्हणून जयंत उठला व त्यानं केबिनमधून टेपरेकॉर्डर आणला व तो उघडून चालू केला. गोड आवाजात गीताचे शब्द उमटले–

"तू असा जवळी रहा......... आळवून आळवून गीता सांगत होती."

"ऐकलस किती गोड गाते ती? याच अति ओढीने माझ्या येण्याची वाट पहात असणार ती. आणि साऱ्या अमृततुल्य प्रेमाची गोडी चाखायला ती धुंद रात्र लवकरच आमच्या आयुष्यात येईल"

रीटाचे सारे युक्तिवाद फुकट गेले होते. एका खलाशाने तिला निस्सीम एकनिष्ठ प्रेमाचे महत्त्व सांगितले होते. पटवून दिले होते. त्या प्रीतीच्या बंधनात तो सुखाने प्रतिक्षा करीत होता मीलनाची! ...........

• • •




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

## अश्वदळ, रथदळ व सैन्य यांच्या बरोबर आर्यांना नौदलाची कल्पना कां सुचली नाही ?




—डॉ. शान्ताराम जोग

**वेदकाळातल्या** आर्यांचा प्रवास मध्य-आशियातून पंजाबातील नद्यांपलिकडील गंगेच्या खोऱ्यापर्यंत झाल्याचीच चिन्हे आपल्याला वैदिक वाङ्‌मयात दिसतात. त्यामुळे विजिगीषु वैदिक आर्यांनी सागरावरील साहसांची चित्रे कां रेखाटलेली नाहीत हे कळते. पाश्चिमात्य जगातील प्राक्‌कालीन, नामशेष झालेल्या, संस्कृतीच्या खुणा सागरसंबद्ध दैवतेतिहासाशी निगडित झालेल्या आहेत. तसे भारतीय आर्यांच्या संस्कृतीचे झालेले नाही. ही संस्कृति आता निसर्गशक्तीशी अत्युग्र लढ्यांच्या पलिकडे आलेली होती. अर्थात्‌च जी काही वैदिक युद्धे लढली गेली ती आर्य आणि दस्यु (वा दास) जमातींमध्ये. क्वचित् आर्यकुळांची आपापसातली. ही युद्धे रानावनातली, दऱ्याखोऱ्यातली व सपाट भूभागातील होती. साहजिकच नौदलाचा युद्धात उपयोग असा क्वचित्‌च झाला असावा. वैदिक कवितेत नौकांचे उल्लेख हे याच कारणास्तव फार फार थोडे आहेत. याउलट अश्वदळ, रथदळ व सैन्ये यांचा उल्लेख मात्र वारंवार केलेला आहे. नौदलाची कल्पनाच मग आर्यांना कां सुचावी?

यावरून अशी मात्र कल्पना कुणी करून घेऊ नये की वेदकाळी आर्य लोक नावांचा उपयोग करीत नसत किंवा त्याना नावांची उपयुक्तता ठाऊक नव्हती ! नावांचा उपयोग नद्या ओलांडून जाण्यासाठी त्यानी केलेलाच होता. किंबहुना पंजाबातील विपुलजला नद्या ओलांडणे एवढे एकच महासंकट त्याना निसर्गशक्तीचे आव्हान होते. अतिशय भयकारी ! आणि हे संकट शब्दशः तरून जाण्यासाठी 'तरी' वा नौका त्याना किती निश्चित करणारे साधन वाटले असेल !

### परिस्थिती आणि कल्पना यांचे संबंध

कोणत्याहि वाङ्‌मयात त्या त्या ठिकाणची व काळची परिस्थिति काही विशेष कल्पनाबंधांची निर्मिति करीत असते. उदाहरणासाठी म्हणून रामलक्ष्मणासह चाललेल्या जानकीचे वाल्मीकीने व दुसऱ्या कुणी संस्कृत कवीने (आजच्याहि हरकत नाही!) केलेले वर्णन वाचावे. दोन हत्तींसह डुलत चाललेल्या हत्तिणीची उपमा वाल्मीकि उपयोजीत आहे तर नंतरचा कवि वेगळीच उपमा योजील, योजितोहि. वैदिक कवीहि मग उपमेचा सहजसुलभ वापर करताना काही विशेष कल्पनाबंध कसे विसरतील? कोणत्याहि दुर्गम प्रदेशापलिकडे जायचे म्हटले तर नावेने जलप्रवाह ओलांडण्याइतके (वा सारखे) त्याना अवघड वाटे. साहजिकच त्यांच्या काही उपमातून हे असे चित्र आपल्याला आढळते.

"आमचे संरक्षण कर, आम्हाला संकटातून सोडव" अशी विनंति कुणा देवतेला करावयाची तीहि 'नाव' ज्याप्रमाणे एखाद्याला प्रवाहापलिकडे घेऊन जाते त्याप्रमाणे तू (वा तुम्ही) आम्हाला न्यावे' या उपमेचा उपयोग करून केलेली आपणाला ऋग्वेदात जागोजागी आढळते. नदीपार—किंबहुना दुथडी ओसंडून जाणारे प्रवाह ओलांडून—जाणे हे नावेवर भिस्त ठेवूनच शक्य असे. त्याप्रमाणेच संकटपार होणे वा शत्रूंवर जय मिळविणे हेहि कुणा इष्ट देवतेवर वा तिच्या साहाय्यावर अवलंबून राहिल्यानेच शक्य होईल हा वैदिक ऋषिकवींचा निश्चित विश्वास होता.

### अभीष्ट देवतांची जलयाने

याच कारणाने काही ऋषिकवींनी आपापल्या अभीष्ट देवतांच्या जवळ स्वतःच्या अशा नावा असाव्यात हेहि वेगवेगळ्या ठिकाणी म्हटले आहे. ऋग्वेदात भरद्वाज ऋषीने 'पूषा' देवतेच्या सुवर्णमय नावांचे वर्णन केले आहे. त्या समुद्रात—म्हणजे जलप्रवाहात—आणि अंतरिक्षातहि संचार करतात. त्यात बसून 'पूषा' सूर्याचा दूत म्हणून जातो. अन्यत्र वरुणाच्या नौकेचा उल्लेख आहे. वरुणाचे वसिष्ठावर इतके प्रेम की त्याने वसिष्ठाला आपल्याबरोबर या नौकेत बसविले आणि 'द्रष्टा—ऋषि' (ऋषिर्दर्शनात्) या पदवीस पोहोचविले. साहजिकच वरुणाला वसिष्ठाचा वंशज पुढील मंत्रात विचारतो, 'आपले ते पुरातन सख्य कुठे गेले? (आम्हाला नाही का अशी मैत्री लाभणार?)', वरुणाला जलसंभारातून संचार

करणाऱ्या नावांचे ज्ञान आहे ही गोष्ट केवळ वसिष्ठालाच ठाऊक नव्हती तर आजीगर्ति शुनःशेपालाहि ते माहीत होते (ऋग्वेद १.२५.७). या देवतांप्रमाणेच ऋग्वेदाच्या सर्वश्रेष्ठ देवतेजवळ म्हणजे इन्द्राजवळ नावा नसत्या तरच नवल! ऋग्वेद ८.१६.११ मध्ये इरिम्बिठिकाण्व–इन्द्राच्या या संरक्षक आणि संकटपार नेणाऱ्या नावेचा उल्लेख करतोच. आदित्य देवतांजवळहि अशा नावा असल्याचे त्याच ऋषीने म्हटले आहे (ऋग्वेद ८.१८.१७).

## अश्विनीकुमारांच्या चार नौका

या देवतांच्याप्रमाणेच अश्विनीकुमारांच्याहि नावा आहेत. परंतु त्यांचा विशेष उपयोग त्यानी तुग्रपुत्र भुज्यूचे संरक्षण करण्यासाठी केला. ऋग्वेदात ही भुज्यूची कथा अनेक ठिकाणी विखुरलेली आहे. तुग्र व भुज्यु आपल्या अनुयायासमवेत नदीतून विहार करीत असताना त्यांच्या शत्रूने त्यांच्यावर हल्ला केला. प्राणभयाने इतर सारे दूर पळाले, एकटा भुज्यु तेवढा समुद्राएवढ्या वाटणाऱ्या प्रवाहात सांपडला. त्याने अश्विनीकुमारांचा धावा केला. आणि आश्चर्य असे की भुज्यूचा शत्रूहि या देवतांचा भक्त असल्यामुळे त्याने आपल्या नावेतून भुज्यूला सुखरूप पोहोचविले. या नावा चार होत्या......त्यात शंभर वल्ही होती. पक्ष्यांनी आकाशात डौलाने सहजसंचार करावा तसा त्या नावा जलाशयावर संचार करीत..... (या शत्रूचे नांव कदाचित् जठर असावे. त्याला या नावा फारच प्रिय होत्या....कारण त्या अश्विनीकुमारांच्याच नावा!) अनाधर जलातून बुडणाऱ्याला त्या तारीत. या नावा म्हणजे अश्विनीकुमारांच्या भक्तवत्सलतेचे मूर्त रुप. म्हणूनच तर ऋग्वेद १.४८.७ या मंत्रात प्रस्कण्व काण्व अश्विनीकुमारांना विनवतो की, '(या संकटांच्या) पार आम्ही जावे म्हणून तुम्ही दोघे आपल्या प्रसादबुद्धींच्या नावेने या'. या शेवटच्या प्रार्थनेसारखीच दुसरीहि एक प्रार्थना आपल्याला ऋग्वेदात आढळते. इंद्राच्या दानाप्रमाणेच एक संकटपार नेणारी ही नाव आहे या कल्पनेनेच आम्ही त्या नावेवर चढलो असे ऋग्वेद १०.१७८.२ या मंत्रात अरिष्टनेमि तार्क्ष्य म्हणतो.

काही काही ऋषीनी तर यापुढची मजल गाठली आहे. एखादी नाव जलप्रवाहात पुढे सारावी. त्याप्रमाणेच आपल्या इष्ट देवतेला आम्ही या अडचणींच्या प्रवाहात आम्हाला तारून नेण्यासाठी पुढे ढकलीत आहोत–खात्रीने ही देवतारुपी नाव आम्हाला तारीलच हा विश्वास बाळगूनच – असे उद्गार ते काढतात. अशीच दैवतकृपेच्या नावांची चित्रमयी भाषा आपल्याला ऋग्वेदातील इतर अनेक मंत्रांतहि आढळते. इतकेच कशाला आपण करीत असलेल्या प्रार्थनेला (वा यज्ञाला)च काही ठिकाणी नाव म्हटलेलेहि आढळते–म्हणूनच तर सौत्रामणी यागात उपयोजिली जाणारी ऋग्वेद १०.६३.१० ही ऋचा साऱ्या यागक्रियेचे वर्णन 'सुरेख वल्ही असणारी, उपद्रव न पोहोचू देणारी, संपूर्ण मुक्तिमय असणारी, नीट संरक्षित जागी नेणारी, सुखावह, न बुडणारी, संरक्षक व प्रशस्त अशी ही दैवी नाव आहे' या शब्दानी करतात. एवढेच काय आपल्या संरक्षणासाठी धावून येणाऱ्या मरुताना सुद्धा 'तुम्ही नावांसारखे आहां' असे ऋग्वेद १०.७७.५ मध्ये स्यूमरश्मि भार्गवाने म्हटले आहे.

आतांच 'न बुडणारी' हे नावेचे विशेष विशेषण उल्लेखिले आहे त्याचेहि कारण सर्व साधारण नावांना बुडण्याचे भय असेच हें होय. याउलट दैवी नाव न बुडणारीच असायची! नावेला मोठे संकट म्हणजे मोठ्या लाटेचे (वा लाटांचे). म्हणूनच तर ऋग्वेद ८.७५.९ या मंत्रांत विरुप आङ्गिरस म्हणतो 'कुणा पाप्याची दुष्टबुद्धि, लाटेने नावेचा नाश करावा, त्याप्रमाणे आमचा नाश न करो!'

## यजुर्वेदातील नौकायान–कल्पना

ऋग्वेदातल्या या कल्पनांपैकी काही कल्पना आपल्याला यजुर्वेदातहि जशाच्या तश्या आढळतात. केवळ दोनच कल्पना खास यजुर्वेदाच्या अशा आढळतात. राजसूय यज्ञातील जलधारा (व सोमरसधारा) वाहताना पाहून ऋषीनी त्यांचे रुपकात्म वर्णन केले आहे. 'या बैलाच्या पाठीवरून या स्वयंसिंचन करणाऱ्या (या जलार्द्र) नावा अहिर्बुध्न्याकडे विविध मार्गानी धावत आहेत' (तैत्तिरीय यजुर्वेद १.८.१४.२; माध्यंदिन यजुर्वेद. १०.१९). तसेच यज्ञकर्त्याला स्वर्गलोकी पोहोचविणाऱ्या 'संयानी' देवतांचे वर्णन करताना ऋषी म्हणतात 'नावा ज्याप्रमाणे एका प्रवाहापासून दुसऱ्या प्रवाहापर्यंत जातात त्याप्रमाणे संयानी देवतांच्या साहाय्याने यज्ञकर्ता येथून स्वर्गलोकात जातो.' (तैत्तिरीय यजुर्वेद ५.३.१०.१; काठक यजुर्वेद २२.६).

## अथर्व–वेदातील उल्लेख

अथर्ववेदात सुद्धा स्वतःच्या अशा काही खास कल्पना आहेत. ऋग्वेदीय ऋषींप्रमाणेच अथर्ववेदीय ऋषिसुद्धा संरक्षणक्षमतेचे प्रतीक म्हणूनच नावांचा उल्लेख करतात. अथर्ववेद ५.४.४.५ मध्ये कुष्ठ नाहीसे करणाऱ्या एका औषधीचे वर्णन, भृगु, अङ्गिरस् असे करतो. 'ही सोन्याची नाव, सोन्याच्या दोरानी घट्ट बांधलेली.....सोनेरी मार्गानी, सोनेरी (सोन्याच्या) वल्ह्यानी आकाशात संचार करते.' अथर्ववेद १२.२.४८ मध्ये सवितृदेवाच्या नावेचा उल्लेख आहे. बैल न जोडलेली ही नाव आहे. यावरून असे दिसते की क्वचित् कुणी बैलांकरवीहि नावा ओढून नेत असावेत. कुठे कुठे लेण्यांमधून कोरीव दगडी कमानी पडतील या भीतीने लेणीकारानी लाकडी आधार दिले आहेत त्याप्रमाणे अथर्ववेद २.३६.५ मध्ये पतीचे मन जिंकण्यासाठी, मंत्रोच्चारण करणारे ऋषी, नवोढेला सांगतात, 'भगाची (सुदैवाचीहि) ही नाव आहे. हिच्यावर चढ. ही परिपूर्ण नाव आहे. हिने तू सवतींचे संकट तरून जाशील.'

वैदिक संस्कृतीचा नौकायानाशी व नौयुद्धांशीहि किती थोडा संबंध होता हे वरील विवेचनाने स्पष्ट होईल. तसेच वैदिक संस्कृतीचा व धर्माचा तेवढाच आधार घेऊन केवळ भूप्रदेशात विस्तारणाऱ्या भारतीय संस्कृतीलाहि समुद्रगमनाचे वावडे कां असावे हेहि कळून येईल. 'समुद्रिय' हे नौकांचे विशेषण जरी ऋग्वेदात आढळते तरी त्याचा सागराशी संबंध नसून पाण्याशी....ओसंडून वाहाणाऱ्या प्रवाहांशी...तेवढा संबंध होता हेहि स्पष्ट केलेले बरे. अर्थातच रामायण–महाभारतातहि केवळ नद्या ओलांडून जाणाऱ्या तरींचाच तेवढा उल्लेख का, हेहि यामुळेच स्पष्ट व्हावे. तसेच क्वचितच 'सेतुबंधात' तेवढे कल्पनेने विस्तारलेले प्राकृत भाषेतले समुद्रवर्णनहि कृत्रिम वाटते ते याच कारणाने हेहि उलगडण्यासारखे आहे. ●●●

**प्रथम मला वाटले मी स्वप्नातच आहे. पण धोक्याची घंटा खणाणतच होती. 'आग! आग!' असे ती घंटा ओरडतच होती....**

**ती आग कुणी विझवली? ...ही कथा वाचा म्हणजे समजेल....**




# आहुति

—रणजोग

**विनाशिका** जेव्हा अथांग समुद्रात वेगाने हालचाल करीत असते तेव्हा ते दृश्य चित्तथरारक असते. मासळीप्रमाणे पाणी कापीत विनाशिका डौलाने, वेगाने व आकर्षक पद्धतीने जात असताना सर्वांचे लक्ष तिच्याकडे वेधले जाते.

यावेळी 'आय्. एन्. एस्. मछली' अत्यंत वेगाने पुढे जात होती. सागरात केव्हा प्रतिकूल परिस्थिति निर्माण होईल याचा नेम नसल्यामुळे आपली कामगिरी पार पाडण्यासाठी 'मछली' अत्यंत वेगाने पाणी कापीत होती.

आम्ही सागरात प्रवेश केला तेव्हा तो अगदी शांत होता. पण दुसऱ्याच दिवशी प्रतिकूल हवामान सुरू झाले आणि नौका हेलकावे खाऊ लागली. 'बॅरो मीटर'-मधील पारा खाली घसरत असल्यामुळे हवामान आणखी बिघडेल याची आम्हाला कल्पना आली.

सागरात मोठमोठ्या लाटा उसळू लागल्यामुळे नौकेच्या डेकवर त्या आदळू लागल्या. नौकेची नासधूस होऊ नये म्हणून शेवटी तिचा वेग कमी करावा लागला. सोसाट्याचा वारा सुटला. त्याचा 'घो घो' आवाज कानावर येऊ लागला. उंच लाटांमुळे पाणी नौकेवर पसरू लागले.

वादळामुळे व लाटेमुळे नौकेवरील नाविक सागरात फेकले जाऊ नयेत म्हणून त्याना धोक्याचा इषारा देण्यात आला. नौकेवरील केबिन्सच्या खिडक्या—दरवाजे बंद करण्याचे हुकूम सुटले. कोणत्या विभागाने कोणत्या दृष्टीने सुरक्षितता ठेवावी त्याचे आदेश देण्यात आले.

नौका चक्राकार फिरू लागली. नौकेवरील बहुतेक नाविकाना 'नौका लागली'. सागरावरील कामगिरी बजाविण्यासाठी प्रथमच नौकेत आलेल्या नाविकांची तब्येत जास्त बिघडली. त्याना हलणेही मुश्किल झाले.

'ब्रिज'वरून मी पहाणी करीत असताना, काही नाविक, नौकेवर आपापले काम करण्यात गुंतलेले दिसत होते. त्यांच्यापैकी काही नाविक संरक्षक फळचांकडे तीरासारखे निघाले होते. त्यांच्याबरोबर एक नाजुक शीख नाविक दिसत होता. त्याच्या गळ्यात बादली होती. आपले कर्तव्य पार पाडण्यासाठी तो झटत होता. तो अत्यंत क्षीण झाल्यासारखा दिसत होता. त्यामुळे तो केव्हा खाली पडेल याचा नेम नव्हता. पण त्याला स्वतःची पर्वा नव्हती. त्याला अगोदर कर्तव्य पार पाडावयाचे होते. म्हणून तो पुढेच चालला होता. नौका लागल्यामुळे आजारी झाला असतानाहि, तो कार्य करीत होता. त्याला विश्रांति घेण्यास सांगितले असतानाही धैर्यवान व्यक्तीप्रमाणे तो आपले कार्य पार पाडण्याच्या इराद्याने झटत होता.

वस्तुतः माझी ड्युटी मध्यरात्री म्हणजे, उशिरा सुरू होणार होती व





अनुक्रमणिका

तत्पूर्वी मी रात्रीचें जेवण आटोपून थोडा वेळ आरामहि करू शकलो असतो. पण जेवण मिळण्याची शक्यता नव्हती. नौकेवरील स्वयंपाकगृहात आग पेट-विणेहि अशक्य होते. एकादा वेळी आग पेटविणे शक्य झाले असते तरी नौकेच्या हेलकाव्यामुळे स्वयंपाकाची भांडी केव्हाच उलथीपालथी झाली असती. म्हणून बिस्किटे खाऊन व पाणी पिऊन आम्हाला जठराग्नि शांत करावा लागला होता.

झोप घेण्याचा प्रश्नच उद्‌भवत नव्हता. मी झोप घेण्यासाठी आडवा झालो असतो तर नौकेच्या हेलकाव्यांमुळे मी कुठल्या कुठे फेकलो गेलो असतो. म्हणून मी 'ब्रिज'वरच थांबण्याचे ठरविले. ज्याना नौका जास्त लागली होती त्याना वॉर्डरूम, किंवा 'कॅबिन'मध्ये पाठविण्यात आले होते. ती रात्र फारच भयानक होती.

मी पेंगत होतो तेवढ्यात धोक्याचा इषारा मिळाला. "नं. २ बॉईलर–रूम-मध्ये आग लागली" असे वारंवार ध्वनि-क्षेपित केले जात होते.

प्रथम मला वाटले की, मी स्वप्नातच आहे. परंतु धोक्याची घंटा खणाणतच होती. 'आग आग' असे ती घंटा ओरड-तच होती.

त्याच वेळी कॅप्टनचा आवाजहि माझ्या कानावर आला व आपणहि उठून काहीतरी काम केले पाहिजे याची जाणीव झाली. जेव्हा मी पूर्ण जागा झालो तेव्हा लेफ्टनंट डीसुझा स्वत:शीच काहीतरी बोलत असल्याचे मला दिसले.

आम्ही शिडीवरून खाली उतरत अस-ताना मिडशिपमन कुमार याने धुरांड्या-कडे पहावयास सांगितले. धुरांड्या-तून धुराचे लोट उठत होते व आकाश काळसर झाले होते.

नौकेवरील सर्व नाविक, आग विझ-विण्यासाठी जीवाचे रान करीत होते. सागरावर वादळ उठल्यावरहि सर्वजण आपापले कार्य चोखपणे पार पाडण्यासाठी झटत होते. वरिष्ठ अधिकाऱ्याचे हुकूम ऐकू येत होते. सर्वत्र धांवपळ सुरू होती.

आग लागल्याचे दिसून येताच ड्युटी-वरील पेटी ऑफिसरने योग्य ती दक्षता घेतली होती व तरीसुद्धा आग पसरली होती असे आम्हाला कळले.

परंतु त्या गडबडीत मुख्य पंखे व 'व्हॉल्व्ज' बंद करायला तो विसरला होता.

डेकवर पाणी पसरले होते. नौकेच्या बॉईलरवर पाणी फेकण्यात येत होते. पण आगीमुळे पाण्याचीहि वाफ होत होती.

बॉईलर खूप तापल्यामुळे तो फुटेल कीं काय अशी भीति वाटत होती व बॉईलर फुटल्यास कदाचित् सर्व नौकाच आगीच्या भक्ष्यस्थानी पडली असती. आगीचा डोंब उसळत होता. परिस्थिति मोठी बिकट होती.

आपली नौका बुडत असल्याचे पाहणे नशिबी येणे ही नाविकाची फार मोठी शोकांतिका असते. त्यामुळे त्याच्या 'कर्तुम् अकर्तुम्' शक्तीला धक्का पोहोचतो.

परिस्थिति अत्यंत बिकट असल्या-मुळे आमच्या नौकेवरील कप्तानास फार काळजी वाटत असेल याबद्दल शंका नाही. परंतु त्यांच्या वागण्यात काळजीचा लवलेशहि दिसत नव्हता. ते अगदी शांत दिसत होते. त्यांच्या आवाजात पूर्वीचाच करारीपणा होता. हुकुमात सुसूत्रता होती व खंबीरपणा होता. नौकेवर स्फोट झाल्यास सुरक्षिततेसाठी नौका सोडून जाता यावे म्हणून, सर्व तयारी बिनबोभाट करण्यात आली होती.

नौकेस सुरक्षित ठेवता येईल की नाही याबद्दल शाश्वति नव्हती. त्यामुळे सर्वत्र स्मशानवत् शांतता पसरली होती. बंदरा-तून गाजावाजा करीत मोठ्या दिमाखाने निघालेली ही नौका सागराच्या पोटात गडप होईल की काय अशी भीति वाटत होती.

नौकेवरील 'व्हॉल्व्ज' व पंखे बंद

## बोट–एक लागणे

**नटी–**



**एक होती नटी–**
**तिला लागली बोट**
**हनिमूनच्या दिवशी**
**तिनें घेतला घटस्फोट.**

**मत्स्यगंधा–**

**एक होती मत्स्यगंधा**
**तिला लागली बोट**
**तिने वापरले तेव्हा**
**पॅरिसमधले 'सेंट'.**

**बाई–**

**एक होती बाई**
**तिला लागली बोट**
**ओकताना म्हणाली–**
**'लूपा'त आली खोट.**

**—ह. शि. खरात**

केल्यास तिला आगीच्या तडख्यातून अद्यापहि सोडविणे शक्य होते. म्हणून काही शूर नाविक त्या दिशेने धावले. परंतु ओरडतच त्याना मागे फिरावे लागले. आगीमुळे त्यांचे अंग भाजले.

आग विझविण्याचे सर्व प्रयत्न फसले. आंतरराष्ट्रीय बिनतारी संदेश पाठवून इतर नौकाना, संकटात सांपडलेल्या आपल्या नौकेच्या साह्यास बोलाविण्याचे नौकेच्या कप्तानाने ठरविले. त्यादृष्टीने त्याने संदेशहि तयार केला.

त्याच वेळी अचानक एक काळी आकृति नाविकांच्या समुदायातून धावत आली व तिला कुणी थांबविण्यापूर्वीच दरवाजा उघडून ती खाली घुसली आणि अदृश्य झाली. त्याने मूर्खासारखे वागून जीव धोक्यात घालू नये, असे कुणीतरी ओरडले, पण त्याचे म्हणणे ऐकून घ्यायला ती व्यक्ति समोर होती कुठे? ती तर विजेप्रमाणे केव्हाच नाहीशी झाली होती.





अनुक्रमणिका

परंतु त्यानंतर पंख्यांची 'घरघर' थांबली. डेकवरील नाविक नव्या उत्साहाने व निग्रहाने आग विझवू लागले. खाली गेलेल्या त्या 'मूर्खा'ला तरी वांचविता यावे, या उद्देशाने ते आग विझविण्याचा प्रयत्न करू लागले. हा 'मूर्ख' कोण होता याबद्दल कुणालाच निश्चित सांगता येत नव्हते.

ती घटना इतकी आकस्मितपणे घडली होती कीं, सर्वजण आश्चर्यचकित झाले होते. हळूहळू आग कमी झाली. शेवटी आग विझविण्यात नाविकाना यश मिळाले. सुदैवाने नौका वाचली होती. परंतु अद्याप सर्वत्र दाहक वातावरण होते. आम्हा सर्वास वांचविण्यासाठी ज्या व्यक्तीने आपला जीव धोक्यात घातला त्याला पाहण्याची प्रत्येकाला अतोनात उत्सुकता होती.

म्हणून ॲस्बेस्टॉस सूट घालून रामप्रताप खाली उतरला. प्रत्येकाने सुटकेचा निश्वास सोडला. त्या वीराचे जीवन सुरक्षित रहावे म्हणून प्रत्येकजण देवाची प्रार्थना करीत होता. कारण त्या वीराने नौकेचे भयंकर स्फोटापासून रक्षण केले होते.

काही मिनिटानंतर, त्या वीराला खांद्यावर घेवून रामप्रताप आला. त्याने दरवाजा उघडला तेव्हा बॉईलर रूममधून पांढरा धूर एकदम बाहेर पडला. त्या वीराचे सर्व शरीर आगीमुळे भाजून निघाले होते. पण त्या वीरास ओळखता आले.

तो दर्शनसिंग होता....काही महिन्यापूर्वीच या नौकेवर तो आला होता. प्रशिक्षण संपवून तो सरळ या नौकेवर आला होता.

दर्शनसिंग प्रथमच नौकेवर आला तेव्हाचा प्रसंग माझ्या डोळ्यांपुढे उभा राहिला...त्याला 'गँगवे'वर भीत भीत चढताना पाहून मला त्याची कींव वाटत होती.

तो अगदीच निरुपयोगी वाटला. त्यावेळी क्वार्टर डेकला 'सॅल्युट' करायलाहि तो विसरला होता. तो म्यायलेल्या सशाप्रमाणे वाटत होता. हा लहानसा नाजुक छोकरा 'गँगवे'वरून चढताना थरथरत होता. त्याच्या खांद्यावरील ओझ्यामुळे त्याला धड नीट चालता येत नव्हते. मोठ्या मुष्किलीने त्याने गँगवेवरून नौकेत प्रवेश केला होता. त्या धडपडीत त्याची पगडी सुटली होती व ती त्याच्या गळ्याभोवती पडली होती. जेमतेम १५ वर्षांचा वाटणारा हा छोकरा नौकेवर कसे काम करील याबद्दल प्रश्न पडला होता. शरीरातील रेखीवपणा, टपोरे शांत डोळे व ओठावर नुकतेच फुटलेले मिसरूड पाहून, नौकेवर हा कितपत उपयोगी ठरेल याचा मी विचार करीत होतो. दिसायला तो 'असा' असला तरी त्याचे स्वतःचे वैशिष्ट्य होते.

नौकेवर आल्यावर काय करायला हवे याचे त्याला ज्ञान नव्हते. तो गोंधळलेला दिसत होता. क्वार्टर-मास्टरने त्याला 'मास्टर-ॲट-आर्म्स'कडे नेण्यास मदत करावी असा मी हुकूम सोडला. दाढी वाढविलेला तो जुना नाविक (क्वार्टर-मास्टर) त्याला पाहून उपहासाने हसला व त्याला त्याने मार्ग दाखविला. ह्या छोकऱ्याबद्दल मला काळजी वाटू लागली. कारण नौकेवरील जीवन म्हणजे 'येरा गबाळाचे काम नोहे'.

त्याला माझ्यापुढे उभे करण्यात आले तेव्हा त्याचे नांव व इतर माहिती मला कळली. तो पश्चिम पाकिस्तानमधील निर्वासित असून, फाळणीच्या वेळी त्याचे, वडील, भाऊ व अन्य नातेवाईकांची ताटातूट झाली. आई व बहिणीसह त्याला सीमेवरील सैनिकांच्या साह्याने भारतात पोहोचता आले. त्याची बहीण उपवर होती. गरज म्हणून तो नौदलात भरती झाला होता. आपल्या आईवर व बहिणीवर भीक मागायची पाळी येऊ नये म्हणून तो नौदलात भरती झाला होता. पूर्वी त्याने समुद्र पाहिला नव्हता व नौकाहि पाहिली नव्हती.

भरती झाल्यावर तो बॉईज 'ट्रेनिंग एस्टॅब्लिशमेंट'मध्ये गेला होता. मेकॅनिकल इंजिनिअरिंग या शाखेमुळे निवृत्तीनंतर मुलकीखात्यात चांगली नोकरी मिळते असे कुणीतरी त्याला सांगितल्यामुळे त्याने मेकॅनिकल इंजिनिअर शाखेत नांव दाखल केले होते.

### नौदल प्रतिज्ञा

**नौदल प्रार्थना पुस्तकातील पहिल्याच पानावर प्रतिज्ञा छापलेली आहे. ती इंग्रजी भाषेत आहे. तिचे मराठी रुपांतर:–**

**हिंद (इंडिया) हा माझा देश आहे. सर्व हिंदवासी माझे बंधु–भगिनी होत. मी माझ्या देशावर प्रेम करतो, व त्याची संपन्न आणि गौरवशाली परंपरा व वारसा याबद्दल मला अभिमान वाटतो.**

**माझे मातापिता, आगबोटीवरील सहकारी व सर्व वयोवृद्ध व्यक्तीना मी मान देईन, आणि सगळ्यांशी शालीनतेने वागेन. जनावरांबाबत मी भूतदया दाखवीन.**

**माझा देश आणि माझे देशबांधव यानाच मी माझी निष्ठा वाहिल्याची प्रतिज्ञा घेतो. त्यांचे कल्याण व त्यांची समृद्धी यातच माझा आनंद सामावलेला आहे.**

**...प्रार्थना पुस्तक पाठपोट एकूण तेहतीस पानी व खिशातील लहान डायरीच्या आकाराचे आहे. निळे प्लॅस्टिकचे आवरण, त्यावर पांढऱ्या शब्दात इंडियन नेव्ही प्रेयर बुक ही अक्षरे व नौदलाचे पांढऱ्या रंगात छापलेले एन्सायन असे ते अत्याकर्षक पुस्तक आहे. पुस्तक म्हणण्यापेक्षा त्याला पुस्तिकाच म्हणणे योग्य ठरेल.**

**जनगणमन या हे राष्ट्रगीत रोमन हिंदीत असून त्याचे इंग्रजी भाषांतरही दिलेले आहे. कविंद्र रविंद्रनाथ ठाकूर यानी ते इंग्रजी भाषांतर केले असल्याने ते समर्पक व सार्थ झाले आहे. त्या पुस्तिकेत काही हिंदी भजने व हिंदी भाषेतील प्रार्थनाहि आहेव.**

अनुक्रमणिका

बॉयलर रूममध्ये हा छोकरा टिकाव धरील याबद्दल मला खात्री वाटत नव्हती. म्हणून त्याला नौकेवर कमी श्रमाचे काम द्यावे असे मला वाटत होते.

'आय्. एन्. एस्. मछली'सारख्या मोठ्या नौकेवर व विशेषतः नौका सागरात असल्यावर एका नाविकास त्याच्या कामाऐवजी दुसऱ्या कामावर लावणे दुरापास्त असते. काळाच्या ओघात नौकेवरील कामाच्या रगाडयात दर्शनचा इतराना विसरहि पडला.

पण नौकेवर दर्शनला खडतर परिश्रम करावे लागत असल्याची मला जाणीव होती. बॉयलररूममध्ये त्याला फार कठीण परिश्रम करावे लागत होते. काही नाविक त्याची चेष्टाहि करीत होते. काही वेळा त्याच्या वस्तू लपवून ठेवीत होते.

मी ज्या ज्या वेळी दर्शनला भेटलो व नौकेवरील खडतर जीवन तो कसे जगतो याबद्दल चौकशी केली त्या त्या वेळी तो सौम्यपणे हसत होता.

त्याने कधीच तक्रार केली नाही किंवा कधी सवलतहि मागितली नाही. जीवनातील दुःखाशी तो एकटाच झगडत राहिला.

त्याच्या नातेवाईकांचे कुशल विचारले असता फक्त त्याच्या भावना चाळवल्या जात होत्या. इतर वेळी तो अगदी स्थितप्रज्ञासारखा वाटत होता. आपल्या आईबद्दल व बहिणीबद्दल त्याला अतोनात प्रेम वाटत होते व ते स्वाभाविकच होते.

वरिष्ठाधिकाऱ्याच्या हुकुमाप्रमाणे तो सर्व काम चोख करीत होता. त्याच्या कामावर अधिकारी खूष होते. सुटी घेवून तो कधी बाहेरहि जात नव्हता.

त्याची चेष्टा करणाऱ्या नाविकाना कालांतराने त्याच्याबद्दल आदर वाटू लागला होता. तो एकांतप्रिय होता. तो अबोल व लाजाळू होता. थोडा भित्राहि होता. इतर नाविकांपेक्षा तो काही वेगळाच होता.

तो आपल्याच जगात वावरत असे. तो गंभीर विषयावरील पुस्तके वाचीत असे. घरून आलेली पत्रे वाचणे व घरी पत्रे पाठविणे याकडेच तो जास्त लक्ष पुरवीत असे. पवित्र 'ग्रंथसाहेब' हे लहानसे पुस्तक तो नेहमी आपल्या खिशात ठेवीत असे.

आम्हाला सागरात नौका नेण्याचा हुकूम सुटला तेव्हा सर्वत्र कामाची गडबड सुरू झाली. बॉयलरमध्ये आग पेटविण्यात आली. साधनसामग्री तपासण्यात आली. प्रत्येक जण आपापल्या कामात गढून गेला. बॉयलररूममधून बाहेर येताना मी पाहिले तेव्हा घाम सुकविण्यासाठी तो बाहेर आला होता.

त्याच्यासारख्या मुलास नौदलावरील जीवन खडतर असल्याची मला जाणीव होती. ताजातवाना होऊन निर्धाराने तो पुन्हा बॉयलररूममध्ये गेला.

नौका सागरात असताना दर्शनची तब्येत बिघडली. त्याला रक्ताच्या उलटया होत होत्या, असे त्याच्या काही साथीदारानी मला सांगितले. त्याला नौका लागली होती. त्याची ड्युटी घ्यायला बाकी साथीदार तयार होते पण तो त्याला तयार होत नव्हता. आपली ड्युटी स्वतःच देण्याची त्याची जिद्द कायम होती.

अशा ह्या वीराने नौकेसाठी बलिदान केले. मातेचा आधारस्तंभ गेला. बहिणीचा भाऊ हरपला. परंतु देशाला एक स्फूर्तिदायक नायक मिळाला.

ह्या वीराची कायम आठवण म्हणून आता 'आय्. एन्. एस्. मछली' या नौकेस 'आय्. एन्. एस्. दर्शन' या नांवाने संबोधण्यात येऊ लागले.

**( 'सैनिक समाचार'च्या सौजन्याने )**







'रत्नागिरी' या कोकण-लाईनच्या आगबोटीला दुसऱ्या महायुद्धात अश्रूंच्या आखातात वर्षभर वावरावे लागले होते. तिच्या धुरंधर कप्तानाने टिपलेले चित्तथरारक क्षण....



रिअर-ॲडमिरल
एस्. जी. करमरकर [निवृत्त]

# अश्रूंचे आखात

**१९४१ चा** जानेवारी महिना होता तो. शाही भारतीय नौदलाची 'रत्नागिरी' एडन–बंदरात नांगरून पडली होती. बरेचसे खलाशी व अधिकारी एडनचा फेरफटका मारावयास गेले होते. पायात स्लीपर्स, मोजे नाहीत, पॅंटीज नाहीत, अंगात अर्धी चड्डी, शर्टही घातलेला नाही, अशा 'मस्ताना' थाटात अस्मादिकांची स्वारी डेकवर एका बाजूला फेऱ्या मारीत होती. थोड्याच वेळात स्नान करून स्वच्छ कपडे करावेत; नि बीयरचे घुटके घेत घेत दुसऱ्या दिवशीचा कार्यक्रम आखावा असा विचार होता–नि त्या अनुषंगाने इतर गोष्टीही डोक्यात घुमत होत्या. पण परमेश्वराला माझी ती चैन साफ नामंजूर होती.

सायंकाळी ६–३० वाजता क्वॉर्टर डेक मेसेंजर, लीडिंग हॅंड रामधीन एकाच दमात गॅंगवेच्या दोन दोन पायऱ्या चढून धावतच समोर उभा राहिला आणि त्याने सलाम ठोकला.

'काय राम, काय गडबड आहे ?'

'सर, एक गोरा माणूस नागरी पहेरावात एका जलद मोटार-पेट्रोल वोटीने आला असून आत्ताच्या आत्ता आपणास भेटू इच्छितो. आणि आपल्याशीच त्याला बोलावयाचे आहे म्हणतोय.'

'ओ. के. पाठव त्याला.'

'आय ऽ आ ऽ य (यस) सर' रामधीन म्हणाला आणि निघून गेला. मी केबिनमधे जाऊन अंगात शर्ट टाकला आणि पायात मोजे चढवीतच होतो. मनात त्या आगांतुकाला शिव्या देणे सुरू होते. डोळे मोजे व बूट ठाकठीक करण्यात गुंतले होते. इतक्यात बुटांच्या टाचा आपटल्याचा आवाज आला. पाहतो तो रामधीन अटेनशनमधे उभा. आणि उंबरठ्यात एक उंच नीच मध्यमवयीन गोरा इसम नागरी पेहेरावात उभा. नजरेला नजर भिडली, नि मला ब्रम्हांड आठवले. रिअर ॲडमिरल 'स्नॉर्स' मरे समोर उभे.

'हॅलो एस. जी., काय म्हणते एडन' स्नॉर्सनी मला विचारले. त्यांच्या निळ्या डोळ्यात त्यावेळी एक मिस्किल झाक चमकून गेली. "कसा पकडला बेट्याला ? मोठा करडा ऑफिसर आहेस ना तू ?" असेच ते डोळे बोलत होते.

'क्षमा करा सर. . . .'

'मारो गोली सर-बीर को', असे म्हणतच मी दिलेले आसन त्यानी नाकारले. 'मला जरा हिंडव पाहू.' मी मुकाट्याने त्याना घेऊन हिंडू लागलो. बोटीचा कानाकोपरा त्यानी धुंडाळला. सर्व काही बरोबर असल्याची खात्री करून घेऊन ते केबिनमधे






आले. मी ड्रिंक्स समोर ठेवली. त्यांच्या आगमनातील हेतू काही त्यानी कळू दिला नाही. अवांतर चौकशीच ते करीत होते. सुमारे दहा मिनिटे तशी गेली. आम्ही ब्रिजवर गेलो. आमची पेट्रोल लाँच तोवर 'रत्नागिरी'च्या कडेला येऊन उभी राहिली.

'ओ. के. एस. जी., चाललो मी' एवढेच स्नॉर्स म्हणाले. आणि ते गेल्यानंतर अस्मादिकांच्या डोक्यात ट्यूब पेटली.

## उजेडातून अंधारात

'रत्नागिरी' ही पूर्वाश्रमींची प्रवासी आगबोट होती. तिचे वजन होते अवघे सहाशे टन. लांबी जेमतेम दोनशे फूट. तिला डबल-स्क्रू-प्रॉपेलर्स होते. आणि उथळ पाण्यातून, चिंचोळचा खाडीतून वा सामुद्रधुनीत ती सहजगत्या वाहतूक करीत असे हेच तिचे भांडवल. युद्ध सुरू झाल्यानंतर ती एक सामान्य, कनिष्ठ प्रतीची लढाऊ आगबोट बनली. एक बारा पौंडी तोफ, जवळचा वेध घेऊ शकणाऱ्या सहा विमान-विरोधी गन्स, पाणबुडी बुडविण्यासाठी डेप्थ चार्जच्या ट्यूब्ज आणि पाणबुडीचा मागोवा घेणारा व त्यावेळी नुकताच वापरात आलेला म्हणून दुर्मिळ असलेला ॲसेडिक सेट (मॅग्नेटिक फील्डच्या साह्याने वेध घेणारे यंत्र) एवढाच काय ती शस्त्रास्त्रे होती. रत्नागिरीला त्यामानाने वेग मात्र चांगलाच होता, ताशी सोळा नॉट्स म्हणजे वीस मैल! त्या बोटीवर जास्तीत जास्त एक हजार उतारु ठेचाठेची करून भरले जात असत. (पस्तीस हजार टनी क्रूझर्सचाही कमाल वेग ३५ नॉट्स असे तेव्हा)

आम्ही डिसेंबर १९४० मधे नाताळचे प्रारंभी मुंबई बंदर सोडले. त्यावेळी मी लेफ्टनंट होतो. आणि बारा वर्षे नोकरी झाल्याने रत्नागिरीचा सर्वाधिकारी (कमांडिंग ऑफिसर) बनलो होतो. युद्ध १९३९ साली सुरू झाले. त्यानंतर वर्षा दीड वर्षातच कमांड मिळणे हे त्याकाळी भारतीय अधिकाऱ्याना स्वप्नवतच होते परंतु एक तर मी मास्टर मरीनर होतो. (मुलकी सागरी वाहतुकीत मास्टर-मरीनर फार श्रेष्ठ मानला जातो.) दुसरे म्हणजे माझी नोकरीही दहा-बारा वर्षे झाली होती. त्यामुळे मला तो हुद्दा मिळाला होता. माझ्या शिप्स कंपनीपैकी इंजिन रुमचे लोक तज्ञ होते. 'डेक' वरील जबाबदार ज्येष्ठ खलाशी आणि कनिष्ठ अधिकारी मंडळीत तिघेजण 'रत्नागिरी'वरच पूर्वी कामाला होते. झैदी नावाचा एक तरणाबांड हैद्राबादी मुसलमान ऑफिसर फार चुणचुणीत असल्याने तो माझ्या दृष्टीने हरकाम्या बनला होता. आणि तेवढा एकच काय तो हिंदी अधिकारी रत्नागिरीवर होता. खलाशी होते सुमारे तीनशे. पण फक्त दहाच नग असे होते की ज्याना खाऱ्या व गोड्या पाण्यातील फरक



**रिअर-ॲडमिरल**
**एस. जी. करमरकर**

समजत असे. बाकीची तर काय. . . . लाक्षणिक अर्थाने अननुभवी मुलेच होती. मध्यपूर्वेतील सागरी मोहिमेवर आम्ही एक वर्षाच्या मोहिमेसाठी निघालो होतो. आणि सांगितले तर आश्चर्य वाटेल, पण १५ डिसेंबरपर्यंत रत्नागिरी ही प्रवासी आगबोट होती. १५ ते १८ डिसेंबर या तीन दिवसात तिचा साजश्रृंगार उतरला गेला आणि दैत्याचे दमन करणाऱ्या चंडिकेची छोटीशी आवृत्ती तयार करण्यात आली. "रात्र थोडी नि सोंगं फार" अशी परिस्थिती असल्याने मुंबई ते एडन या प्रवासात आम्ही कसून मेहनत घेतली. त्यामुळे सर्व नाविक आणि अधिकारी यांची सर्वांगीण पारख तर झालीच. त्याशिवाय भ्रातृभाव वाढला. आणि रत्नागिरी उत्कृष्ट ठरावी असे प्रयत्न स्वयंस्फूर्तपणे होऊ लागले.

## पुढाकारामुळे मिळालेली संधि

एडनला पोहोचल्यानंतर त्या भागातील सर्वोच्च नौदल अधिकारी रिअर ॲडमिरल स्नॉर्स यांच्या कचेरीतून मिळणाऱ्या हुकुमांप्रमाणे एडन ते पोर्ट सैद या टापूत आम्ही वावरत होतो. आम्हाला आधार म्हणून शाही नौदलाची 'ल्युसिया' मिळाली होती. पण ती किती म्हातारी होती ? तिचे माहेर होते जर्मनी. पहिल्या महायुद्धात तिला पकडून शाही नौदलाच्या हरेममधे (राणीवसा) दाखल करण्यात आले होते. आणि तिला काम काय होते ? तर पाणबुडीच्या तैनातीस राबणे. एकीकडे काफिल्याबरोबर टेहेळणी, संरक्षण वगैरे कामे करीत असतानाच दुसरीकडे युद्धाची खुमखुमी सुटली होती. हात शिवशिवत होते. आणि त्यातूनच आम्ही सर्वांनी एक उपद्व्याप केला होता. कालांतराने एडन ते पोर्ट सैद हा मार्ग पक्का ध्यानात बसल्यानंतर मी एके सायंकाळी सर्व अधिकाऱ्याना वॉर्डरुम (ऑफिसर्स मेस) मधे बोलावले. आणि युद्धात स्वतंत्रपणे काम करण्याचे दृष्टीने 'रत्नागिरी' जय्यत तयार आहे हे वरिष्ठाना पटावे, म्हणून तिच्या टिकाऊपणाचा आणि आमच्या कर्तबगारीचा विस्तृत अहवाल तयार करून एडन बंदराचे नौदल-प्रमुख कॅप्टन गन याना पाठविला. त्यानी लगेच ते लोण ॲडमिरल स्नॉर्सकडे धाडले. दरम्यान त्या अहवालातील ज्या तपशीलाकडे अधिक लक्ष देणे जरूर होते, तेही आम्ही आपणहून पुरविले व 'फायरिंग-फिट' बनलो. 'स्नॉर्स' यानाही तो अहवाल पसंत पडला. आणि त्यामुळेच त्या सायंकाळी ते दत्त म्हणून येऊन उभे ठाकले होते.

## खडक, वाळू आणि अश्रु

रोमेलची घोडदौड सुरु होती. तिला आळा घालण्यासाठी आफ्रिकेच्या उत्तर पूर्व किनाऱ्यावरील ब्रिटीश सोमालीलँड,







फ्रेंच सोमालीलॅंड, इथोपिया, इरिट्रिया व ईजिप्त या देशांच्या किनाऱ्यावर लष्करी डावपेचानुसार व मागणीनुसार सैन्य आणि रसद पोहोचविणे, हल्ल्यासाठी सैन्य उतरविणे, उत्तरेस सुवेझ कालव्याच्या शेवटच्या टोकापासून तो दक्षिण व दक्षिण-पूर्वेस एडनच्या आखातात – वाहतूक करणाऱ्या मालवाहू व सैन्यवाहक आगबोटीना संरक्षण देणे, पाणसुरुंग उपसणे, तसेच ते पेरणे ही जबाबदारी अॅडमिरल स्नॉर्स यांच्यावर होती. या सबंध भागाचे नौदलापुरते ते सर्वोच्च अधिकारी होते.

वर नमूद केलेल्या संरक्षक स्वरुपाच्या कामगिरीबरोबरच इटालियन व जर्मन पाणबुड्या बुडविणे हाही बोजा आमच्या शिरावर होता. उरवठ्यास पुरवठा म्हणजे तो सबंध सागरी किनारा. खडकानी समृद्ध. किनाऱ्यापासून दूरवर खोल पाण्यात वावरावे तर पाणसुरुंग व पाणबुडी अशी दोन्ही संकटे आ वासून उभी ! विशेष म्हणजे आफ्रिका खंड आणि पेरीन बेट यात पसरलेल्या त्वाब-अल-मंडलेब' सामुद्रधुनीत ठिकठिकाणी खडक तसेच ऐन प्रवाहात वाळूचे पट्टेच्या पट्टे (सॅंड–ड्यूनस) पसरलेले होते. त्यातून नौका हाकारण्यासाठी नागमोडी वळणे घेता घेता कप्तानांच्या नाकी नऊ येत. ते रडकुंडीला येत असत. म्हणूनच "बाब-अल-मंडलेब" ला अश्रूंची सामुद्रधुनी म्हणत. आणि या शब्दाचा अर्थही तोच आहे. . . .

## ती पहिली रात्र

अॅडमिरल स्नॉर्स यांच्या भेटीनंतर तिसऱ्याच दिवशी सायंकाळी कॅप्टन गन यांजकडून मला हुकूम मिळाला की १३ नंबरच्या काफिल्यास एडन ते असावपर्यंत जावयाचे आहे. या काफिल्यात 'रत्नागिरी' संरक्षक म्हणून इतर युद्धनौकांसह भाग घेईल. तसेच खुद्द रत्नागिरीवर युद्धसामग्री आणि सैनिक ठेवले जातील. तयारी करा व काफिला क्र. १३ मध्ये बहात्तर तासानी सामील व्हा. तो हुकूम वाचताच आम्हाला आनंद झाला तसेच जबाबदारीचाही भार जाणवला. पण आता आम्ही तैय्यार होतो. एक सिंह आणि त्याच्या मागेपुढे चालणारे उंदीर (दि लायन लीडिंग दी रॅट्स) असे रत्नागिरीचे, माझे व माझ्या शिप्स कंपनीचे वर्णन केले जाऊ लागले. कारण एडनमधील शाही नौदलाच्या तोडीस तोडच काय, त्यांच्याहूनही सवाई असल्याचे आम्ही सिद्ध केले होते. जेव्हा जेव्हा बाब–अल मंडलेबमधे बोट घालण्यास इतर अनुभवी कप्तान कचरत तेव्हा तेव्हा स्नॉर्स व गनचे डोळे माझ्यावर खिळत. आणि मीही तितक्याच उत्साहाने पण शांतपणे ती कामगिरी स्वीकारून यशस्वी करीत असे. 'लायन ऑफ दि रेड सी' हा किताब मला सरकारने दिलेला नाही. तर वरिष्ठ व कनिष्ठ अधिकारी तसेच शाही आणि भारतीय नौदलातील खलाशी यांचा माझ्यावरील प्रचंड विश्वास, आणि जडलेले लोभाचे नाते यातून ते बिरुद मला लागले. म्हणूनच यापुढे मला इतर मानमरातबाची किंमत कधीच वाटली नाही. त्याच बरोबर प्रत्येक सफरीच्या वेळी

मी मनोमन त्यांच्या सुरक्षिततेचाच सदैव विचार करीत असे. आणि त्याच एका कसोटीवर बरे-वाईट, कडक-सौम्य निर्णय घेऊन ते कर्तव्य कठोरतेने पार पाडीत असे. अस्तु.

ठरल्याप्रमाणे काफिला निघाला. एडन ते पोर्ट-सैदपर्यंतचा अर्धा प्रवास निर्विघ्नपणे पार पडला. पुढे निघाल्यावर 'एल्फिस' या ग्रीक आगबोटीच्या इंजिनात बिघाड झाल्याने ती मागे मागे पडू लागली. तेव्हा तिला पोर्ट सैदपर्यंत सोबत करण्यासाठी रत्नागिरीला मागे ठेऊन इतर आगबोटी झपाट्याने पुढे निघून गेल्या. सकाळी ती फाटाफूट झाली. आणि त्याच रात्री आमच्यावर पहिली आपत्ती ओढवली.

सुमारे अकरा वाजता 'अॅसेडिक'वर पाणतीरांच्या (टॉर्पेडो) आवाजाचे ध्वनि ऐकू आले. मला वर्दी मिळताक्षणी दुर्बिण उचलून पाहिले. ती दुर्बिण विशिष्ट बनावटीची असल्याने काळाकुट्ट रात्रीतही सर्व काही सुस्पष्ट दिसत होते. एकामागून एक असे पाच सहा पाणतीर सुय्सूंऽ करीत, पाणी कापीत आमच्या जवळून निघून गेले आणि काही मिनिटातच त्यांचे स्फोट कानावर आदळले. सुदैवाने 'एल्फिस' पर्यंत पोहोचण्यापूर्वीच त्यांचे प्रॉपलजन (गति) संपल्याने ते मधेच फुटले होते. रत्नागिरी दिसायला लहान होती.तरी तिला दोन धुरांडी असल्याने रात्रीच्या वेळी पाण्यावर येऊन किंवा पेरिस्कोपने पहाणाऱ्या पाणबुडीला त्या दोन धुराड्यांमुळे ती मोठी युद्धनौका असावी असे वाटले होते. आणि तिची रुपरेषाही पालटून टाकल्याने त्या तर्काला अधिकच पुष्टि मिळाली होती.

'पाणतीर. . . सर' असे अॅसेडिक रुममधून कळताच मी हुकूम सोडला. . .

'अॅक्शन स्टेशन. . . कंडिशन वन. . ऑल हॅंड्स नॉट मॅनिंग अेनी पोस्ट टू अपर डेक...(आणिबाणी – स्वरुप प्रथम श्रेणी... जे लोक कामात गुंतलेले नसतील त्यानी ताबडतोब डेकवर यावे.) झाले, भराभर धडपडत ठेचाळत पण आवाज न करता न बोलता तीनशेपैकी दोनशे पन्नास खलाशी व अधिकारी डेकवर हजर झाले. सर्वांना भराभर डेकभर पांगवून, पडून पण अति सावध रहाण्यास सांगितले. प्राणरक्षक पडावांची कामगिरी वाटून देण्यात आली. गन-क्रू बंदुकीजवळ सिद्ध राहिला. सर्वांनी आपापले लाइफ-जॅकेट अडकवले. त्या वेळेचा एकंदर सीन काय वर्णावा ?

कोणाच्या पायात नुसतेच मोजे तर कुणाच्या नुसतेच बूट.. कोणाच्या अंगात फक्त गंजी तर कोणी अंडरवेअरमधेच हजर. उत्सुकता आणि भीति याचे प्रतिबिंब प्रत्येकाच्या चेहेऱ्यावर उमटलेले होते. ज्याना पहाटे चारपासून पहारा होता ते झोपेतून डोळे चोळतच वर आले होते. गॅली-मेसेंजर प्रसादने गॅलीवर चहाचे आधण ठेवले होते. साखर वितळून पाण्याला उकळी फुटू पहात होती. चहाची पत्ती टाकणार इतक्यात बेल खणाणली. . . . . . यांच्या म्हणतच त्याने इलेक्ट्रिक शेगडी बंद केली व ते कढत गोड पाणी मगमधे

भरून त्याचे घसा जाळणारे घुटके घेतच तो वर आला. न जाणो आता गरम पाणी तरी प्यायला मिळेल की नाही ? त्या धडपडीत मंगला धक्का लागून शेजारच्या एका खलाशाच्या अंगावर शिंतोडे उडाले.... अरे.....तूच मला मारायला निघालास की, तो बडबडू लागला. गपरे मूर्खा – पेटी ऑफिसर निरंजन त्याचेवर खेकसला. मी ते पाहिले होते पण तिकडे दुर्लक्ष केले. दुसऱ्या एका टेलिग्राफ खलाशाने याच्याही वर कडी केली. त्याला माझ्या ब्रिजमध्ये बोलावण्यात आले होते. त्याने वॉटर बॉटलमधे रम भरली होती. ती पीत पीत स्वारी झपाझप येत होती. त्याने ब्रिजमधे पाऊल ठेवण्यापूर्वी शेवटचा घोट घेतला. आणि तो आत येतो न येतो तोच सब लेफ्टनंट इस्माईलने आपला हात जोराने उगारला. पण माझेही लक्ष होतेच. मी तो तसाच वरचेवर धरला आणि त्याला म्हटले 'आत्ता तमाशा नको. पुढे पाहू' त्यावेळी त्या खलाशाला शिक्षा करणे कायद्याने योग्य होते. परंतु मनुष्य स्वभावाविरुद्धही होते. शिक्षा केली असती तर आमच्यातील घरोबा जिव्हाळा एका क्षणात संपला असता. कॅप्टनला हेही लक्षात ठेवावे लागते.

पहाटेपर्यंत रत्नागिरी ॲक्शन स्टेशनमधेच होती. पण जसा जसा धोका कमी होत गेला तसतसा मीही ताण सैल केला आणि दिवस उजाडताच 'पूर्ववत् व्यवहार' सुरु केले. त्यामुळे खलाशांच्या मनावर आणि शरीरावर विनाकारण ताण पडला नाही. बिचारे प्रसंगी तीन तीन दिवस अर्धपोटी राहून काम करीत. करणे भाग पडे. पण कुरकुरत नसत. मीही त्यांच्याप्रमाणे रहात होतो. फरक इतकाच की तास–अर्धातास विश्रांति घेण्यासाठी माझा मी मुखत्यार होतो. आणि त्यावेळी कमीअधिक प्रमाणात खात-पीत होतो. तथापि त्यांची सुरक्षितता हेच ध्येय असल्याने गाढ झोपेतसुद्धा मी सावध असे. 'कॅप्टन सर...' व्हॉईस पाईपमधून एकदाच शब्द उमटले की पुरत. (बोटीवरील टेलिफोन व्यवस्थेला व्हॉईस-पाईप म्हणतात). मी लगेच प्रत्युत्तर देत असे. आणि भराभर पुढील व्यवस्थेला लागत असे. दुसऱ्या दिवशी सकाळी ऑफिसर्स वॉर्डरुममधे इटालीमधील रेडिओ बारीचा वृत्तनिवेदक मोठ्या उत्साहाने सांगत होता, "काल रात्री आम्ही एक क्रुझर व चार मालवाहू आगबोटी बुडविल्या."

"...अरे तुझे बाप इथे जिवंत बसले आहेत वे," चीफ पेटी ऑफिसर रॉड्रिग्ज अस्सल ठेवणीच्या शब्दांच्या पखरण करीत बोलला. आणि मग एल्फिस व रत्नागिरीचे अधिकारी त्या प्रसंगाचे वर्णन 'काय सांगू महाराजा' या थाटात करू लागले.....

## काही जळकथा



**खलाशी–**

एक होता खलाशी
गायचा भीमपलास्
गातां गातां मारला सूर
आणि गेला तळास.

**तांडेल–**

एक होता तांडेल
नको तिथे तंडेल
पाण्यांत राहून
माश्यांशी भांडेल.

**कोळी–**

एका कोळियाने
खोल टाकला गळ
'जलपरी' पाहून
गांठला त्याने तळ.

**देवमासा–**

एक होता देवमासा
तो हंसला खुदकन्
उगवले पाण्याचे
झाड नाकातून.

—ह. शि. खरात

एल्फिसवर चोवीस वर्षांचा सर्जन लेफ्टनंट ग्रेग होता. लग्न झाले नि चौथ्या दिवशीच तो बाहेर पडला. त्या घटनेला चार महिने होऊन गेले होते. विचारा फुरसतीच्या वेळात सदैव पत्नीची स्वोचेस काढीत बसावयाचा. बोट बंदराला लागली की बाकीचे सर्व अधिकारी मजा मारावयाला पाळीपाळीने जात असत. पण हा पठ्ठ्या कधीच बाहेर पडत नसे. सदैव काहीतरी हरवल्याच्या स्थितीत तो एरव्ही आढळत असे. मात्र कामही चोख होते त्याचे. म्हणूनच तो आवडावयाचा सर्वांना.

त्या रात्री बेल खणाणली तेव्हा स्वारी नाईटसूटमधे ऑफिलियाचा (पत्नी) फोटो घेऊन तिच्याकडे पहात पहातच झोपली होती. बेल खणाणताच एका हातात फोटो, तर दुसरा हात लाईफ-जॅकेट अडकविण्यात गुंतलेला अशा अवस्थेत त्याचा कॅबिनमेट लेफ्टनंट पायरसने पाहिले होते नि तेव्हापासून बंदुकीचा मोर्चा संभाळतानाही पायरस त्याला छेडीतच होता. सर्व शांत झाल्यावर सगळे अधिकारी ड्रिंक्ससाठी एकत्र जमले होते. तेव्हा पायरसने पुन्हा पुन्हा तो किस्सा खुलवून सांगण्यास प्रारंभ केला. तशात ग्रेग अबोल. त्यामुळे तर पायरस वाटेल ते बडबडू लागला नि सारे खदखदा हसू लागले. ग्रग रडवेला झाला. बरे, सर्वात ज्युनियर असल्याने दोन हात करण्यापूर्वी त्यालाही विचार पडे. अखेर कॅप्टन योव्हाननेच पायरसला दटावले, बस झाले तुझे पुराण. आता एकच शब्द बोललास तर ही बाटलीच टाळक्यात बसेल बघ.

तो प्रकार पुन्हा एकदा सर्वांना ऐकविण्यात आला. तेव्हा मी ग्रेगची बाजू घेतली. मी म्हणालो ग्रेग तूच शहाणा बघ. या गध्ध्याना काही आहे का जनाची ना मनाची? तिकडे पत्नी रोज माळ जपते हे सुखरुप असावेत म्हणून. आणि हे दिवटे रोज नवे रंग ढंग खेळण्यात मश्गुल. जाने दो—अजून एक राऊंड होऊन जाऊदे ड्रिंक्सचा. आणि दारुच्या फेसात सर्व राग लोभ विरघळला.

पोर्ट सैदला आम्ही दोन फेब्रुवारी रोजी सुखरुप पोहोचलो. अशा तऱ्हेने आमची ती पहिली रात्र——चांदणी रात्र–संस्मरणीय ठरली. अरे हो सांगायचे विसरलोच बरं का, ॲसेडिकवर पाणतीर–ध्वनी–टिपले गेले तेव्हा बहुधा अष्टमी असावी. त्या पर्यटनानंतर अशा पुष्कळशा फेऱ्या आम्ही मारल्या. पण दैव अनुकूल होते. सहकारी चांगले होते. यामुळे रत्नागिरीसह सर्वच जण सुरक्षित राहिलो.

[उत्तरार्ध पुढील अंकात]






[३]

डेस्डेमोनाच्या तोंडाला कांद्याचा वास....
लग्नाच्या वाढदिवशी डोक्यात शँपेनची बाटली....
नटवर्याची पहिली 'मृत' भूमिका....
प्रेमाची 'जखम' हृदयात नाही. तर अंगांगावर...
या व अशाच अनेक रोमहर्षक प्रसंगांची पखरण....



रोचक, रोमहर्षक, रोमांचित

# "ऐतल मी ऐधुंद मी!"

## आजार खोटा, उपचार चांगला

**लंडनच्या** वॉटर्लू स्टेशनात एरॉल उतरला तेव्हा त्याच्या खिशात फक्त दोन शिलिंग तीस पेन्स होते. तो शहरातल्या आधुनिक सुखसोयीच्या बर्कली हॉटेलात उतरला. बॅग फाटली होती. अंगावर सामान्य कपडे होते. फक्त ते खाकी रंगाचे होते. "**फ्रेंच सोमालीलॅण्डमध्ये** माझे सामान चोरीस गेले" असे त्याने टेबलावरील कारकुनाला सांगितले. आणि "बार्कले बँकेत माझे सोने आलेले आहे." त्याची कल्पना दिली. कारकुनाने नॉईनचा राजा ज्या खोलीत राहिला ती खोली एरॉलला दिली. वडिलाना त्याने तार केली. पण ते आले नाहीत. बँकेकडे सोने आले नसल्याचे त्यानी सांगितले. मोठा पेच उभा राहिला. मग त्याने एक दिवस अपेंडिसाएटिसचा अॅटॅक् आल्याचे नाटक केले. हॉटेल चालकानी त्याला 'वेस्ट एंड'च्या एका रुग्णालयात ठेवले. दवाखान्यातल्या डॉक्टरानी दोन दिवस तपासणी केली आणि त्याला काहीही झाले नसल्याचे सांगितले–तेथल्या नर्सला त्याने ही कहाणी सांगितली. तिला त्याची दया आली. तिने पैसे दिले. पण लग्नाची अट घातली. दोन दिवस तो तिच्यासाठी तेथे राहिला. बँकेचे सोने हाती आले. त्याने त्या नर्सचे पैसे परत केले. पण कर्जमुक्त झाला नाही.

## डेस्डेमोना आणि कांदे

नोकरीच्या शोधात एरॉलला एका नाटक कंपनीच्या क्रिकेट टीमकडे जावे लागते. "तुला क्रिकेट खेळता येते काय?" रॉबर्ट यंग नांवाचा कंपनीचा डायरेक्टर त्याला विचारतो. एरॉल क्रिकेट कधी खेळलेला नव्हता. पण त्याने धडाकून उत्तर दिले. "निश्चितच येते." तुला बॉलिंग येते की बॅटिंग? तुझी स्पेशॅलिटी काय? त्याच्या प्रश्नाचा अर्थच एरॉलला कळला नाही पण त्याने तडक उत्तर दिले. "ते कॅप्टनवर अवलंबून आहे." कंपनीची क्रिकेट टीम होती. त्यांना बारावा गडी हवा होता.

"तुमच्या नाटकाचे काय? माझ्यासाठी त्यात सुयोग्य भूमिका आहे काय?

"तुम्हाला नाटकाचा बराच अनुभव आहेसं दिसतं?" डायरेक्टर म्हणाला. त्या वाक्यात श्लेष होता. एका '**फेअरी टेल**' मध्ये त्याला एका वाईट बुद्धीच्या राजपुत्राची भूमिका दिली गेली. त्याने खूप भयानक मेकअप केला. आणि रंगमंचावर तो आला. समोरच्या रिकाम्या रांगा पाहून तो आपले संवाद विसरून गेला. हातपाय गळाले. दिग्दर्शक यंग पुढे आला. त्याने तो भयानक मेकअप पाहिला. आणि तो ओरडला "निघून जा! काढून टाक तो मेकअप्" भरीत भर म्हणून काही दिवसांनी कॉन्हेंटरी संघाच्या विरुद्ध त्यांच्या कंपनीची क्रिकेटची मॅच झाली. क्रिकेटविषयीच्या एरॉलच्या अज्ञानामुळे सामन्यात त्यांच्या संघाला जबर पराभव सहन करावा लागला. डायरेक्टर यंगने एरॉलला त्याच्या कार्यालयात बोलावले व तो म्हणाला "फ्लिन्, मला फार खेद होतो." एरॉल म्हणाला












"माझा तो घातवारच असावा. त्या दिवशी मला माझे संवादच सारखे आठवू लागले. नाहीतर मी खचितच चांगला खेळलो असतो." "क्रीडांगणावर तुला नाटकातल्या ओळी आठवल्या. आणि तू आमचा पराभव होऊ दिलास!" यंग ओरडून म्हणाला, तो विलक्षण संतापला होता. दर आठवड्याला सहा पौंड देण्याच्या लायकीचा एरॉल आहे असे त्याला वाटेना. त्याने एरॉलला निरोप दिला. पण "कमी पगाराची सूचना" येताच एरॉल तिथे राहिला. त्याच कंपनीच्या नाटकातून त्याला लहान मोठी कामे मिळाली. त्याच्या ऑथेल्लोच्या कामाबद्दल तो स्वतःच लिहितो. "**माझी तो भूमिका अजूनही लोकांच्या चांगली स्मरणात आहे. इंग्रजी रंगभूमीच्या इतिहासात इतका भिकार ऑथेल्लो कधी झाला नाही, असे म्हटले गेले.**" त्या नाटकात इंग्लंडची सुप्रसिद्ध नटी **फ्रीडा जॅक्सन** हिने **डेस्डेमोनाची** भूमिका केली होती. तिला कांदे भयंकर आवडत. एरॉलला त्यांची घृणा होती. डेस्डेमोना मृत्युशय्येवर असताना ऑथेल्लो तिच्याजवळ तोंड नेऊन म्हणतो, "प्रिये!" एरॉलला ते वाक्य उच्चारणे म्हणजे महासंकट वाटले. कांद्यांचा इतका उग्र वास तिच्या तोंडाला येत होता.

## राजकन्या आणि तारांचा व्रश

'**पॅरिस**' बोटीवर न्यूयॉर्कला जाण्यासाठी एरॉल चढला. तेव्हा त्या बोटीवर **मार्ले ओबेरॉन, लुई हेवर्ड** आणि **निओमी थियारोविच** ही रशियन **राजकन्या** ही मंडळी होती. याशिवाय सुप्रसिद्ध नटी **लिली डामीटा** हीही त्यात होती. एरॉल त्यात नवीन होता. डामिटाने त्याचे लक्ष वेधून घेतले होते. त्याने तिला नृत्यासाठी पाचारण केले. तिने "पुन्हा कधी तरी" असे उत्तर दिले. न्यूयॉर्कमध्ये वॉर्नर ब्रदर्सने त्याची व्यवस्था सेंट मॉरिटझ् हॉटेलमध्ये केली होती. तो लिफ्टपाशी उभा राहिला. तेवढ्यात तेथे ती रशियन राजकन्या आली. तिने आपला रूम नंबर सांगितला. ती खोली आठव्या मजल्यावर होती. एरॉल १० व्या मजल्यावर होता. खोलीत गेल्यावर त्याने **निओमीला** (रशियन राजकन्या) फोन केला. ओळख दिली. तिने त्याला आपल्या खोलीत पाचारण केले. एरॉल गेला. दोघांनी शँपेन घेतली. आणि काही घटकांनी ती दोघे एकमेकांच्या गळ्यात हात घालून शय्यागृहाकडे गेली, पण रशियन राजकन्येच्या हातातल्या कडक तारांच्या ब्रशामुळे एरॉलच्या ढुंगणाला भयंकर जखमा झाल्या. त्यातून रक्त येत होते. एरॉलला त्या स्त्रीच्या त्या विचित्र वागण्याची भीति वाटली. तो निघाला. "हॉलीवुडमध्ये भेटू या" ती म्हणाली.

एरॉलचा "सॅडिझम्" चा तो पहिलाच अनुभव होता.

## प्रेताची अप्रतिम भूमिका

१९३५ च्या प्रारंभी एरॉल हॉलिवुडला गेला. त्याचे वय २६ वर्षांचे होते. काही महिने त्याला फक्त टेनिस खेळण्या-



बद्दल व सुयोग्य शरीर राखण्याबद्दल पगार मिळाला. त्याने एक लहान गाडी घेतली. स्टुडियोत तो **जेरी वाल्ड** ह्या तरुण पण अपरिचित लेखकाबरोबर जेवत होता. त्याला वाल्डचा डायरेक्टर मित्र ह्याच्या मध्यस्थीने The case of the Curious Bride मध्ये एका **मृत माणसाची भूमिका मिळाली तो त्याने फार अप्रतिम वठवली असे लोकांचे मत पडले**" असे तोच म्हणतो.

ती भूमिका करून एरॉल स्टुडियोच्या टेनिस कोर्टवर उभा असताना त्याची आणि **लिली डामिटाची** भेट झाली. बोटीवरचा प्रकार विसरून तिने एरॉलला 'हॅलो' केले. ते "हॅलो" एरॉलच्या आयुष्यात क्रांति करून गेले. लवकरच ती दोघे एकत्र आली. एकत्र राहिली. त्यांचे प्रेमसंबंध जुळून आले. आणि मग त्यानी एकत्र घर करून राहण्याचा संकल्प केला. **लुक आऊट माऊंटन**वर त्यांनी एक सुंदर जागा मिळविली.

लिलीने त्याला खूप फिरविले. खूप नवे जग दाखविले. लिलीमुळेच त्याच्या आणि चित्रपट व्यवसायातील सुप्रसिद्ध व्यक्तींच्या ओळखी झाल्या. त्यात काही सुंदर नटीही होत्या. एरॉलला त्यांच्या भेटीने आनंद वाटत होता. पण लिलीला मात्र त्यामुळे संताप येत होता. स्वामित्व कल्पना ही तिच्या मनाची स्थायी भावना होती. लिली आणि एरॉलने चांगले कौटुंबिक जीवन जगण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांच्यात भिन्नता खूप होती. लिलीला स्वयंपाक फार चांगला येत असे. त्यांच्या दोघांच्या जीवनात वारंवार संघर्ष उत्पन्न होत, पुन्हा पुन्हा समेट होत असे. भांडणे, समेट असेच वारंवार सुरू झाले होते.

## संसार हवा, लग्न नको

एक दिवस **बड अर्स्ट** त्यांच्या घरी आला. मनात चांगल्या भावना ठेवून तो त्याना म्हणाला, "माझ्याजवळ विमान तयार आहे. तुम्ही दोघं असं कां करीत नाही. एकाद्या सकाळी युमाला जा आणि लग्न करून टाका!" १९३५ च्या जून महिन्यातली ही गोष्ट होती. ती सूचना ऐकून एरॉल मनात म्हणाला "ओऽऽ! लग्न करायचं? बापरे!!"

पण लिलीला ती सूचना फारच आवडली. पण एरॉलच्या मनाला मात्र मरगळ आली. लग्न ह्या संस्थेवर त्याचा विश्वास नव्हता. वयाच्या सातव्या वर्षापासूनच ती त्याची धारणा झाली

होती. आणि लिलीसारखी सुंदर, कलावती स्त्री आयुष्यात आल्यानंतरही त्याचे ते मत बदलले नव्हते.

दुसऱ्या दिवशी सकाळी एरॉलने धाडस करून लिलीला आपली लग्नविषयक मते ऐकविली. लिली भडकली. तिने भिंतीवर वस्तु-भांडी फेकायला सुरुवात केली. अश्रु, वैताग आणि हिस्टेरिया ह्या क्रमाने लिलीचे थैमान सुरू झाले. त्यानंतर ती खिडकीशी जाऊन उभी राहिली. तो घाबरला. "काय करायचा तिचा विचार आहे?" ह्या विचाराने त्याचे मन कंपित झाले. तेवढ्यात ती त्याला म्हणाली, "तू जर माझी अशी उपेक्षा करणार असशील तर मी ह्या खिडकीतून उडी टाकून जीव देईन."-त्याने तिला मागे ओढले. व प्रीतीची शपथ घेतली. दोघांनी लग्न लावले. पण दोघांनाहि लग्न बंधनाची तेवढीशी संवयही नव्हती. स्वभावात ते बसण्यासारखे नव्हते. ही लग्न व्यवस्था टिकणारी नव्हती. अखेर ती मोडलीही!

## कीर्ति, पैसा आणि खंतही

"**कॅप्टन ब्लड**" ह्या चित्रपटाने एरॉलला कीर्ति मिळवून दिली. त्या चित्रपटासाठी नायक म्हणून **रॉबर्ट डोनटची** निवड झाली होती. पण वॉर्नर ब्रदर्सशी त्याचे मोठे भांडण झाले. आणि **ऑलीव्हिया दहॅविलँड** हिच्याबरोबर एरॉलची चाचणी झाली. जॅक वॉर्नरने निर्णय घेतला. "**कॅप्टन ब्लड**" हे चित्र खूप गाजले. पैसाही मिळवून दिला वॉर्नर ब्रदर्स ह्या कंपनीला! त्याचा दिग्दर्शक होता **मायकेल कर्टीझ**! त्याचा वास्तववादावर अधिक भर होता. त्यामुळे खरा रक्तपात त्याला हवा असे. त्यामुळे रॉबिनहुड, चार्ज आफ् द लाइट ब्रिगेड इत्यादि चित्रपटासाठी एरॉलला त्याच्या हाताखाली पाच वर्षेपर्यंत काम करावे लागले.

कॅप्टन ब्लड, रॉबिनहुड सारख्या चित्रपटांनी मिळविलेल्या यशामळे एरॉलला विशिष्ट प्रकारच्याच भूमिका दिल्या जाऊ लागल्या. त्याबद्दलची खंत व्यक्त करताना एरॉल म्हणतो, "**कलाक्षेत्रात नट नव्याने जेव्हा पदार्पण करतो तेव्हा त्याला करार पूर्ण करणे एवढीच भूमिका असते. भूमिकांच्या निवडीचा प्रश्न नसतो. मग मात्र कलावंत वेठीला धरला जातो. त्याच्यातल्या कलावंताची कलाविष्काराची इच्छाच नाहीशी होत जाते.**" ही खंत एरॉलने आपल्या ह्या आत्मकथेत वरवरा व्यक्त केली आहे.

## वाढदिवसाची "भेट"

लिली आणि एरॉलच्या प्रेमाच्या पहिल्या वाढदिवसाच्या पार्टीला एरॉल एक तास उशिरा गेला. तिच्या दृष्टीने लग्नापेक्षाही त्या दिवसाला फार महत्व होते. पन्नासहून जास्त लोक एकत्र आले होते. सारी माणसे जमल्यावर एरॉलने प्रवेश केला. आणि तो साऱ्यात मिसळला. तेवढ्यात "एरॉल, अरे बघ तरी" अशी हाक दिली गेली. आणि मग लिलीचा आवाज त्याच्या कानी पडला. "प्रिया, वाढदिवसाचे अभिनंदन!" असं म्हणत तिने शँपेनची एक अख्खी बाटली त्याच्या डोक्यात हाणली. त्यामुळे एरॉल गोंधळला. त्याच्या अंगाखांद्यावर रक्ताचे ओघळ वाहत आले होते. संतापाच्या भरात त्याने लिलीच्या थोबाडात मारली. तिचा जबडा दुखावला गेला. एक दात पडला. एरॉलला शुद्ध आली तेव्हा त्याला आढळून आले की, लिली त्याच्या पायाशी पडली होती. एरॉलच्या डोक्यात जबर जखम झाली. ऑपरेशन करावे लगाले. पण एका स्त्रीवर आपण हात टाकला पत्नीला आपण मारले ह्या गोष्टीची त्याला फार खंत वाटली. जखमेला अठरा टाके पडले. दवाखान्यातून सुटका झाली तेव्हा डॉक्टर त्याला म्हणाले "लिलीने तुम्हाला घरी बोलावले आहे." "कशाला ? आणखी चार, दोन जखमा डोक्याला करून घ्यायला? मी तिचे तोंडही पाहणार नाही" असं तो म्हणाला खरा. पण घरी गेला. लिली त्याला म्हणत होती. "कसं रे तू असं केलंस ? माझा

दात"——एरॉल काही बोलला नाही. त्याच्या मनातल्या साऱ्या कोमल भावना जणु करपून गेल्या होत्या ! त्यांचे एकत्र राहणे म्हणजे एकमेकांचा छळवादच होता.

**हॉलिवुड आणि ऑटोग्राफ्स**

डॉ. कोएट्सची तार आली 'मी येतो आहे' एरॉलला खूप आनंद झाला. त्याने लिलीला ती वार्ता सांगितली. जॉन डेकरला सांगितली. त्याला पाहिल्यावर जॉन म्हणाला, "हा किंगकाँग दिसतो." लिली तेथेच होती. एरॉल आणि कोएटस् दिवसभर गप्पा मारीत बसले. लिली ऐकत होती. १२०० माकडे घेऊन ती न्यूयॉर्कच्या एका संस्थेला त्याने विकली. त्यानिमित्ताने त्याने न्यूयॉर्कला भेट दिली होती. रात्रीच्या खाजगी गप्पात एरॉलने त्याला आपली व लिलीची कथा ऐकविली. दुसरे दिवशी कोएटस् हॉलिवुडमध्ये गेला. एरॉलने साऱ्यांच्या ओळखी करून दिल्या. त्याने स्वाक्षऱ्यांची वही काढली ही गोष्ट वास्तविक हास्यास्पद मानली जाते हॉलिवुडमध्ये ! त्यामुळे एरॉलला ते आवडले नाही. ते दोघे शिकागोला गेले. एरॉलने एक सिंहीणीचे लहानसे बछडे विकत घेतले. त्याला नाव दिले **विलिंग्डन** ! फार मोठी टिप मिळण्याच्या आशेने त्या दोघांना टॅक्सीवाल्याने टॅक्सीत घेतले. पण ते सिंहीणीचे बछडे ड्रायव्हरच्या मानेवर वारंवार उडया मारीत होते. गाडी थांबत थांबत जात होती.

**एरॉल फ्लिन ठार !**

स्पेनमध्ये यादवी युद्ध सुरू झाले. तेव्हा डॉक्टर कोएटस् आणि एरॉल हे दोघे स्पेनमध्ये वृत्तपत्रप्रतिनिधी म्हणून जातात. एका रात्री ते असेच रस्त्यातून हिंडत असताना एक स्पॅनिश तरुणी हातात पिस्तुल घेऊन त्यांचा पाठलाग करते. ती त्यांना विचारते "सॅल्व्हो कंडक्टो!" डॉक कोएटस् त्या मुलीच्या खांद्यावर थोपटतो आणि स्मित करतो. ती हातातले पिस्तुल त्याच्या पोटात रोखून विचारते "कोण आहात तुम्ही? शत्रू की मित्र ? तुमचे कागदपत्र दाखवा!" डॉ. कोएटस् खिशात हात घालून ते कागद शोधू लागतो. एरॉल एका स्पॅनिश घराच्या बाल्कनीखाली उभा राहतो आणि ती गंमत पाहतो. डॉ. कोएटस् त्याचे ओळखपत्र शोधीतच राहतो. त्याच्या चेहऱ्यावर स्मिताची रेषा उमटते. आणि एकदम विचार बदलून तो त्या स्त्रीच्या खांद्यावर हात ठेवतो. आणि थोपटल्यासारखे करतो.



डोळ्यात वाच माझ्या
तू गीत भावनांचे.....

"द न्यु ॲडव्हेंचर्स ऑफ डॉन जॉन" या चित्रपटात एरॉल फ्लीन व विवेका लिंडफोर्स.

तेवढ्यात पिस्तुलाच्या गोळीचा आवाज होतो. डॉक्टर कोएटस्च्या शर्टातून, त्याच्या अंगाला चाटून गोळी निघून जाते. गोळी झाडून ती मागे सरकत गेली. डॉक्टरने तिचा माग सोडला नाही. त्याने तिच्या हातातले पिस्तुल काढून घेतले. आणि "'तुला त्याची खरच गरज आहे काय?" असे हळुवारपणे तो म्हणाला.

तेवढ्यात बॉंबफेक झाली. आणि एरॉल ज्या इमारतीखाली उभा होता ती कोसळली. एरॉल त्या खाली सापडला. त्याला दवाखान्यात नेण्यात आले. डॉक्टर कोएटस् त्याची सेवा करीत होता. त्या दवाखान्यात जास्तीत जास्त कामे आणि ऑपरेशन्स त्याने केली. बरे झाल्यावर ते दोघे बाहेर पडले. एरॉलच्या व कोएटस्च्या हातात मशीनगन्स होत्या. पण एरॉलच्या समोर तोफगोळे पडत होते. बॉम्बफेकही तो पहात होता. पण तरीही मशीनगन चालवावी असे मात्र त्याला वाटत नव्हते. हे युद्ध आपले नाही हीच त्याची धारणा होती. एरॉल हॉस्पिटलमध्ये असताना वृत्तपत्रात बातम्या पसरल्या होत्या :

**"एरॉल फ्लिन स्पेनमध्ये ठार झाला."**

स्पेनमध्ये जाण्यापूर्वी एरॉल **फ्रॅंकलिन डी रूझवेल्ट** (ज्युनिअर) यांना वारंवार भेटत असे. त्याच्या ओळखीमुळे अमेरिकन अध्यक्ष रूझवेल्ट यांचीही एरॉलने भेट घेतली होती.

**पाहिले, प्रेमात पडले, पळाले**

एकवीस क्लबमध्ये एरॉल आणि त्याची बहीण रोजमेरी बसलेली होती. एरॉलचे लक्ष कोपऱ्यात बसलेल्या एका स्त्रीने वेधून घेतले. ती होती **आमेलिया हॉलिफंट !** लिलीनेच त्याची तिच्याशी ओळख करून दिली होती. तो उठून तिच्या टेबलापाशी गेला. ती विवाहित होती. माता होती. पण त्या भेटीमध्ये दोघेही एकमेकांच्या आत्यंतिक प्रेमात पडले.

अनुक्रमणिका







# क्रौर्य आणि सहृदयता यांचा मिलाफ



**१५ व्या शतकाच्या प्रारंभी पोर्तुगीजांचे पांढरे पाय भारताच्या पश्चिम किनाऱ्याला लागले. थोड्याच वर्षात अफान्सो ड-अल्बुकर्क या महत्वाकांक्षी सेनापतीकडे भारताचा पश्चिम किनारा जिंकण्याची कामगिरी आली. त्याने केलेल्या अत्याचाराचे वर्णन त्याच्याच शब्दांत वाचा :**

**त्याचे ते ऐतिहासिक पत्र भारतीय नौदलाच्या मुंबई येथील संग्रहालयात जपून ठेवण्यात आले आहे.**

**—— नंतर मी सारे शहर जाळले आणि प्रत्येक गोष्ट तलवारीच्या धारेखाली आणली (कापून काढली – कत्तल केली) त्यानंतर कित्येक दिवस लोक सतत रक्त ओकत होते. (अंगावर तलवारीच्या वारांनी ज्या जखमा झाल्या होत्या त्यातून रक्त ठिबकत होते) ज्या ज्या ठिकाणी तेथील मुसलमान सांपडले किंवा पकडले गेले त्यापैकी एकालाही जीवदान मिळाले नाही. त्यांच्या मशिदी स्फोटक द्रव्याने भरण्यात आल्या आणि त्याना आगी लावण्यात आल्या. आम्ही सहा हजार मुडदे मोजले. सम्राट, ते कार्य फार महान होते. त्यासाठी झुंजही तितकीच प्रबळ झाली आणि यशही तितकेच दणदणीत मिळाले. गोवा मीच जिंकल्याने, त्याचा ताबा माझ्याकडे यावा, एवढीच माझी इच्छा आहे. महाराज, आपण निर्धास्त असावे की, एतद्देशीय लोकांच्या चारित्र्यासारखे चारित्र्य एक सच्चा पोर्तुगीज या नात्याने माझ्याजवळ असते, तर आपल्या हुकुमाप्रमाणे प्रत्येक घर उकरून फोडले असते, प्रत्येक किल्ल्याच्या खाली दारुगोळ्याची पिंपे उडवून दिली असती. निदान निव्वळ आसूरी आनंदासाठी तरी भारतातील नवीन घडी बसविताना आवश्यक ती पाने पिसण्यासाठी ते कृत्य मी केले असते. परंतु जोपर्यंत मी हयात आहे आणि भारतीय घडामोडींचा तपशील आपणास पाठविणे हे माझे कर्तव्य आहे तोपर्यंत गोवा नष्ट केले जाता कामा नये. कारण त्याच्या विनाशानेसुद्धा माझ्या शत्रूंना विनाशाचाही आसुरी आनंद उपभोगावयास मिळता कामा नये आणि जोपर्यंत तेथील रहिवाशांच्या इच्छेनुसार तेथे त्यांच्या पसंतीचा एकादा गव्हर्नर नेमला जात नाही, तोपर्यंत गोवा आहे तसाच टिकविण्यासाठी मी माझ्याच खिशातून पैसे खर्च केले पाहिजेत. . . .**

"त्यापूर्वीच्या नुसत्या किरकोळ भानगडी होत्या. हे प्रेम–निष्ठावंत प्रेम होते" असे एरॉल स्वतःच म्हणतो. सेंट्रल पार्कमध्ये चार दोन गुप्त भेटीगाठी झाल्या. लिलीच्या कानावर ती गोष्ट गेली. तेव्हा एरॉलने आणि आमेलियाने पळून जायचे ठरविले. कुठे, कसे हे ठरले नव्हते. ती मुलगा, नवरा सारे सोडून जायला तयार झाली होती. तिच्या सहवासाची आत्यंतिक ओढ त्याला लागली.

एके पहाटे तीन वाजता गाडी घेऊन एरॉल आमेलियाच्या घराशी उभा राहिला. कपड्याची पेटी आली, मग ती आली. दोघे विमानतळावर गेले. न्यू ऑरलीन्सला ते पोहचले तेव्हा एरॉल तिला म्हणाला, "आमेलिया, आता तू आणि मी. कुणालाही आपला शोध लागायचा नाही." तेवढ्यात त्याला विमानतळावरच **नॉर्वल हॅरिस** भेटला. एरॉलने त्याला सांगितले की मला एकांत हवा आहे. माझी बायको खवीस आहे. न्यूयॉर्क सोडण्यापूर्वी तो फोनवर लिलीला म्हणाला होता की घरी यायला उशीर होईल. तेव्हाच तिने त्याला दम भरला होता. "पुन्हा त्या बाईला (आमेलियाला) भेटशील तर बघ !"

नॉर्वलने त्याला एक छोटी स्टीमबोट विकत घेऊन दिली. किंमत खूप होती. एरॉलचा एक दिवसाचा पगार त्यात गेला. मिसिसिपीच्या जलाशयात एरॉलने ती बोट सोडली. एका भूभागाशी ती बोट लागली "सुटलो" असा निःश्वास दोघानी टाकला. तेवढ्यात दोन वार्ताहर आपापले कॅमेरे सरसावून पुढे आले. त्यांनी छळवाद मांडण्यापूर्वीच त्यांच्यापैकी एकाला एरॉलने उचलून गरगर फिरविले आणि मिसिसिपीच्या कांठच्या गाळात फेकून दिले. दुसऱ्याच्या हातातला कॅमेरा काढून घेतला व फिल्म काढून घेऊन त्याने कॅमेरा परत केला. बोटीतून ती दोघे भटकली. आपण दोघेही चुकतो आहोत असे दोघांनीही मनमोकळेपणाने कबूल केले. पण इलाज नव्हता. कारण तिच्या नवऱ्यावर तिचे प्रेम नव्हत व लिलीवर एरॉलचे प्रेम नव्हते.

"आमेलियाइतके प्रेम मी कधीच कुणावर केले नाही." असे त्याने लिहून ठेवले आहे. पण आमेलियाचे व एरॉलचे हे नाते वर्ष दीडवर्ष टिकले, तिच्या नवऱ्याने बंदूक घेऊन एरॉलच्या घरी जाऊन दम भरला. लिलीचा संताप झाला, गुंतागुंत वाढली. आपण कुणाही स्त्रीला कायमचे संसाराचे सुख देऊ शकत नाही ही एरॉलची भावना तीव्रवर बनत गेली.

## जनरीत सारखीच

जॅक बरीमूर (वा जॉन बॅरीमूर) चा मृत्यु २९ मे १९४२ ला घडला. त्याच्या आणि एरॉलमध्ये गाढ स्नेह होता. एरॉलच्या घरी तो काही महिने येऊन राहिलेला होता. त्यावेळी तो जवळजवळ संपलेला होता. त्याच्या मृत्यूनंतर वास्तविक त्याचे शव स्मशानात नेऊन पुरायला हवे होते. पण कल्पक व श्रेष्ठ दिग्दर्शक **राऊल वॅल्श** त्यावेळी जमलेल्या मंडळीत होता. त्याने स्मशानातल्या माणसाला पैसे दिले आणि स्वतःच्या स्टेशन वॅगनमध्ये ते प्रेत घालून एरॉलच्या घरी नेले. कारण जॉनची चुलती वृद्ध होती. तिला त्याच्या शवाचे दर्शन घ्यायचे होते. एरॉलला त्याची कल्पना नव्हती. त्याने जॉनच्या मृत्यूचा आघात बुजवून टाकण्यासाठीं मद्य घेतले होते. त्या धुंदीत तो घरी गेला त्याने दार उघडले. दिवा लावला. बॅरीमूरचे प्रेत समोर दिसले. त्याला प्रचंड धक्का बसला. तो तडक बाहेर आला. गाडीत बसून कुठेतरी दूरवर पळून जावे ह्या विचाराने तो खाली उतरला. तेवढ्यात वॅल्शने त्याला हाक मारून सांगितले "अरे, त्याच्या तोंडात बोळा घातला आहे."

एरॉल परत आत गेला. पण हृदय थरथर कापत होते. पण त्याला वाटत होते की, जॉन बॅरीमूरची ओळख राखण्याची ही पद्धत फार चुकीची आहे. बॅरीमूरच्या शवयात्रेत राऊल वॅल्श आणि एरॉल हे दोघेजण होते. राऊल त्याला म्हणाला "आपली शवपेटी उचलणारे कोण लोक आहेत हे बॅरीमूरला कळले तर तो पेटीत उठून बसेल."

बॅरीमूरचा द्वेष करणारांचाच त्यात प्रामुख्याने भरणा होता.

**[क्रमशः]**





अनुक्रमणिका

" आगबोटीवर दहिवडा ?".... हो, हो, दहिवडा ! एवढेच नव्हे, तर गुलाबजाम सुद्धा ! आणि रोगनजोस सुद्धा ! आणि शिवाय 'हाय़् टी '!.... नाही हो ! 'हाय टी' म्हणजे उंच चहा नव्हे हो !....



## लेफ्ट॰ कमांडर जॉर्ज

**यांची मुलाखत वाचा ! म्हणजे सारे तुम्हाला समजेल....!!**

**दिवसभरचे** जहाज दुरुस्तीचे काम आटोपून आय्. एन्. एस्. म्हैसूरचे लेफ्टनंट कमांडर जॉर्ज आपली दाढी कुरवाळीत ऑफिसर वॉर्डरूममध्ये येऊन दुसऱ्या दिवसाच्या कामाची आखणी करीत बसले होते. अवती भवती सिगरेटच्या धुराची वलये उठत होती. जॉर्जच्या त्या दाढीमुळे अधिकच रुबाबदार दिसणाऱ्या व्यक्तिमत्वाबद्दल चर्चा सुरू होती. सारेच वातावरण खेळीमेळीचे होते. पण जॉर्जला मात्र कोचीन नेव्हल बेस आठवत होता. कारण कोचीन हे "म्हैसूर"चे माहेर. आणि जॉर्ज केरळचा रहिवाशी. स्वाभाविकच केव्हा एकदा पुन्हा कोचीनला जातो असे त्याला वाटत होते. तेथे त्याची रुथ तसेच डेव्ही आणि ल्युसी त्याची वाट पाहात होती. जॉर्ज स्वप्न रंगात रंगला होता. संयमी आणि शांत स्वभावाचा असल्याने गावभर भटकण्याची त्याला सवय नव्हती. चुकला फकीर मशिदीत ह्या न्यायाने जॉर्ज एक तर त्याच्या केबिनमध्ये असावयाचा नाहीतर ऑफिसर्स वॉर्डरुममध्ये ठेवलेलाच.

"I say George" या उद्गारानी जॉर्जचे लक्ष वेधून घेतले आणि तो खाड्कन उभा राहिला. "म्हैसूर"चे एक्झिक्युटिव्ह ऑफिसर लेफ्ट. कमांडर खन्ना त्याचे समोर उभे होते.

मनातील खळबळ साफ लपवून जॉर्जने विचारले 'Yes, Sir ?"

"हे बघ, उद्या आपला मेस कसा चालतो हे पाहण्यासाठी एक कोणीतरी पत्रकार येणार आहेत अशी सूचना कमांडरसाहेबांकडून मला आताच मिळाली आहे. तो कार्यक्रम "फॉसिफ" ऑफिसकडून आला आहे एवढे तुला सांगितले म्हणजे पुरे. कारण तसा तू हुशार आहेस", लेफ्ट. कमांडर खन्ना म्हणाले.

"हो सर, पण माझा त्यात काय संबंध आला?" "वारे पठ्ठे. तुलाच ते सगळे पार पाडावे लागणार आहे. आणि हे बघ त्या सिव्हीलीयनसमोर आपला काहीही पसारा दिसता कामा नये. तो उद्या सकाळी १०। ते १०॥ च्या दरम्यान तुझ्याकडे येईल. ओ. के. नं?"

"रॉजर, सर". (रॉजर—ठीक आहे).

खन्ना बाहेर निघून गेले. आणि जॉर्ज दाढीशीच मनोगत करीत नसत्या आफतीचा विचार करू लागला. पण लगेच त्याला एका प्रकारे बरेही वाटले. कोणत्याही का निमित्ताने होईना नौदलाकडे लोकांचे आता वाढते लक्ष आहे हा विचार मनात आल्याने त्यांची ३६ इंच छाती २ इंच वाढली. आणि काहीशा खुषीतच त्याने शीळ घालण्यास सुरुवात केली.

दुसऱ्या दिवशी सकाळी 'चीफ पेटी ऑफिसर' कुंदरन् याला जॉर्जने आल्या आल्या बोलावून घेतले आणि स्वच्छता आणि टापटीप ह्याजकडे जातीने लक्ष पुरविण्यास फर्मावले. बरोबर १०। वाजता एक किरकोळ बांध्याची व्यक्ति एका अधिकाऱ्यासह गोदीत नांगरून पडलेल्या "म्हैसूर"वरती थडकली. त्या व्यक्तीबरोबर आलेल्या अधिकाऱ्याने जॉर्जला बोलावून घेतले आणि त्याची व शिवकुमारची ओळख करून दिली. शिवकुमारला न्याहाळीत जॉर्ज आपल्या मनाशीच म्हणाला, "हे ध्यान आले तर!" कारण त्याच्या मनाने रंगविलेले पत्रकाराचे स्वरुप थोडे भिन्न होते. रुबाबदार व्यक्तिमत्व, उंची कपडे घातलेला, डोळ्यांना चष्मा, बगलेत कॅमेरा आणि तोंडात चिरूट किंवा सिगरेट, बुटाला चकचकीत पॉलीश असा माणूस पत्रकार म्हणून त्याने कल्पिला होता. पण प्रत्यक्षात समोर आलेली व्यक्ति अतिशय साधी होती.

"या! मी आपलीच वाट पहात होतो." असे जॉर्ज म्हणाला आणि त्याने ओळीने सहा शिंका दिल्या. विचारा! कधी नव्हे ती पहाटेपासून त्याला जबरदस्त थंडी लागली होती. ड्यूटीवर असल्यामुळे आणि त्यांच्याकडे पाहुणे येणार असल्याने थंडीचा जालीम उपायही त्याला करता आला नव्हता. "माफ करा हं" काहीसा ओशाळल्यागत होऊन जॉर्ज म्हणाला "काही नाही हो. माफ काय करायचं, चौलायचंच." असे बोलत बोलत जॉर्ज आणि शिवकुमार "म्हैसूर"च्या भटारखान्याकडे निघाले.

"आमच्या जहाजावर सहाशे माणसांपर्यंत जेवणाची व्यवस्था करता येते". असे सांगून जॉर्जने शिवकुमारला बरोबर घेऊन गॅलीत (स्वयंपाकघर) पाऊल टाकले. "म्हैसूर"च्या तळापासून तिच तीन मजले होतात. मधल्या मजल्यात ती गॅली आहे. गॅलीत शिरता क्षणी डाव्या हाताला एक भले मोठे ऑटो मिक्स्चर यंत्र दांडचाने आटा तिंबत होते. त्याच्या बरोबर समोर ब्रेड तयार करण्यासाठी विजेचे ओव्हन् (भट्टी) होते. थोडे पुढे गेल्या-





अनुक्रमणिका

नंतर सुमारे ३५ किलो तांदूळ शिजविता येतील एवढे मोठे कॅलड्रॉन होते. वाफेच्या दावाने कॅलेड्रॉनचा उपयोग भाता-मटणापासून ते भाजी उकडण्यापर्यंत केला जातो. त्या कॅलड्रॉनच्या आजुबाजूला अनेक छोटचा-छोटचा विजेच्या शेगडचा होत्या. बाजूलाच पाटा वरवंटाही होता. तसेच उकडलेल्या बटाटचांच्या साली काढणारे एक यंत्रही होते. सारी भांडी स्टेनलेस स्टीलची होती. गॅलीमध्ये काम करणाऱ्या नाविकांचे कपडेही त्या मानाने पुष्कळच स्वच्छ होते. शीतगृहात साठविलेले मटण कापण्यासाठी एक स्वतंत्र खोली होती. त्या खोलीला एक विचित्र दर्प येत होता. बांगुर्डे, झुरळ हे त्या दर्पाने पार पळून जातील या हेतूने एका रंगात तो दर्प मिसळून तो रंग तेथे लावण्यात आला होता. पण आपल्याला तसे करण्यासाठी ह्या दोन पायाच्या प्राण्यानी अशी काही युक्ति केली आहे हे त्या बांगुर्डे, झुरळे ह्यांच्या गावीसुद्धा नव्हते. मात्र तीही खोली एरवी तितकीच स्वच्छ होती. कोठेही कसल्याही प्रकारची घाण नव्हती. एकीकडे हे सारे समजावून सांगत असताना जॉर्जचे बारीक लक्ष सगळीकडे फिरत होते. ११ वाजले. "हाय टी" ची वेळ झाली होती. प्रत्येक मेसचा प्रमुख आपल्या सवंगडचासाठी चहा नेण्यात गर्क होता. चतुर जॉर्जने शिवकुमारला परत भटारखान्याकडे नेले. "महाराज! स्वयंपाक तयार झाला आहे. आपण जेवून घ्यावे असे त्याने मोठ्या विनम्रतेने सांगितले." अखेर हो ना करता करता व्हिजीटेरियन पुलाव, पापड आणि काय सांगायचे दहिवडा की हो, शिवकुमारच्या प्लेटमध्ये आला!

"आगबोटीवर आणि दहिवडा?"

"अहो महाराज दहिवडाच काय घेवून बसलात. तुम्हाला गुलाबजामही खावयास मिळतील. तसेच रोगनजोस्च्या सतरा तऱ्हा, पुलावचे नाना प्रकार, तऱ्हेतऱ्हेचे केक्स. तुम्ही काय म्हणाल ते येथे तुमच्या सेवेला हजर होईल."

"खरं की काय?"

"मी काय खोटं बोलतोय!" तुम्हाला आता रोजचा चहा फराळ भोजनाचा कार्यक्रमच सांगतो म्हणजे मग तर तुम्हाला पटेल?"

"नौदलातील भोजन व चहाची व्यवस्था तीन प्रकारात विभागलेली असते," अशी सुरुवात करून लेफ्ट. कमांडर जॉर्जनी सांगितले की "बोटीच्या कप्तानासाठी छोटेसे स्वतंत्र स्वयंपाकघर असते. त्याचे जेवण, त्याला लागणारा फराळ, चहा-कॉफी सर्व काही तेथून पुरविले जाते. त्याचप्रमाणे कमिशन्ड ऑफिसर्सची व्यवस्था असते. मात्र नाविकांच्या भोजनाचा खर्च सरकार करते, तर सर्व ऑफिसर्सना स्वतःच्या खिशातून पैसे द्यावे लागतात. साहजिकच त्यांचा मेनू नाही म्हटले तरी वेगळा असतो. चीफ पेटी ऑफिसर व पेटी ऑफिसर्स यांचा मेस स्वतंत्र असतो. स्वतंत्र अशा अर्थाने की त्याना त्यांच्या वॉर्डरूममध्ये जेवणखाण व चहा-फराळ पुरविला जातो. पण नाविकाना मिळणारा आहारच त्यानाही मिळतो. उरले नाविक. साधारणपणे वीस नाविकांचा एक गट पाडलेला असतो. तो गट रहाण्या जेवण्याच्या सोयीने केलेला असतो. तसेच त्यांच्या कामाचे स्वरूप लक्षात घेऊनही ती रचना केलेली असते. चहाफराळाची, भोजनाची वेळ झाली की मेस प्रमुख ते ते पदार्थ गॅलीतून आणवून घेतात व वाटतात. "वॉच ड्यूटी"वरील नाविक व अधिकाऱ्याना ड्यूटीवर जाण्यापूर्वी जेवणखाण मिळते. आधी नंबर त्यांचा मग इतरांचा. तसेच चहा वगैरे बाबतही तीच व्यवस्था. साधारणपणे प्रत्येक मेसमध्ये एक इलेक्ट्रिक शेगडी असते. नाविक चहा साखर व दूध या वस्तू गॅलीतून घेऊन जातात. व तेथेच चहा बनवून घेतात. प्रत्यक्ष लढाईत जेव्हा सर्वजण गुंतलेले असतात तेव्हा एकतर प्रत्येकाला त्या त्या ठिकाणी जेवणखाण किंवा चहा पुरविण्याची व्यवस्था होते. किंवा त्यावेळी असलेल्या परिस्थितीनुरुप गटागटाने ती मंडळी गॅलीत येऊन जेवण घेऊन जातात. मात्र इमर्जन्सी (ॲक्शन स्टेशन्स) कालावधीत बहुतेक वेळा हवाबंद डब्यातील अन्नावर भर असतो. कारण ती परिस्थिती सर्वस्वी भिन्न असते.

"पण काय हो, अधिकारी व नाविक यांच्या जेवणात फरक असणे ही प्रथा चांगली की वाईट? जगातील अन्य नौदलात काय पद्धत आहे?"

"त्याचे असे आहे पहा, परदेशी राजवटीतून आलेला तो एक पायंडा आहे. तो मोडणे जरूर आहे, असे मला व्यक्तिशः वाटते. पण एक ओष्ट आपण लक्षात घेतली पाहिजे. नाविकाना सरकार अन्न मोफत पुरविते, तर अधिकाऱ्याना भोजनाचे पैसे द्यावे लागतात. जगातील इतर नौदलांपैकी बहुतेक सर्व नौदलातून अधिकारी व खलाशी यांचे जेवण एकत्र असते. रॉयल नेव्हीत सुद्धा तीच पद्धत आहे –" लेफ्ट. कमांडर जॉर्ज म्हणाले. जेवणासंबंधीच्या वरील ज्या दोन पद्धति आहेत त्यांच्यासंबंधी आणखी एक मुद्दा लेफ्ट. कमांडर जॉर्जनी सांगितला–हातात थाळी घेऊन जेव्हा नाविक रांगेने जेवणासाठी गॅलीत हजर होतात तेव्हा त्या वाटपाला "सिंगल-प्लेट" म्हणतात. पण उलट मेसमध्ये जेवण नेण्याच्या पद्धतीला "ब्रॉड साईड" म्हणतात.

## लंच म्हणजे डिनर

आता आपण दैनंदिन आहारासंबंधी बोलत आहोत असे सांगून लेफ्ट. कमांडर जॉर्ज बोलू लागले, सकाळी उठल्याबरोबर चहा मिळतो. पण त्या चहाचे वाटप असे होत नाही. बहुतेक सारेजण मेसमधील स्टोव्हवर चहा करून पितात.

साधारणपणे आठ-साडेआठला छोटी हजेरी (ब्रेकफास्ट). ब्रेड-बटर, मोड आलेली कडधान्ये किंवा डाळी; व सर्वाना कॉफी मिळते. शाकाहारी लोकाना दूध दिले जाते. तर मांसाहारी लोकाना आठवडचातून ठराविक प्रमाणात अंडी दिली जातात. छोटचा हजेरीसाठी सूजी (सांजा), बटाटे भजी, बटाटेवडा, केक, बिस्किटे अशाही वस्तू पालट म्हणून दिल्या जातात. साडेदहा वाजता फक्त चहा मिळतो. त्याला "हाय टी" म्हणतात. आता








"हाय टी"ला तसा भारतीय अर्थ काहीच नाही. रॉयल नेव्हीत "हाय टी" म्हणतात तोच संकेत आपल्याकडेही आला आहे.

दुपारच्या जेवणाला नौदलात "डिनर" म्हटले जाते. लंच हा शब्द अस्तित्वात नाही. साधारणपणे पाऊण ते दीडपर्यंत जेवण होते. दोन्ही जेवणातून प्रत्येक नाविकाला एकूण दरदिवशी साडे-तीन पौंड अन्न सकस आहाराच्या रूपाने दिले जाते.

भात हे नाविकांचे 'आंतरराष्ट्रीय' प्रमुख खाद्य. दुपारी फक्त भात असतो. आठवड्यातून दोनएक वेळा 'चिकन' किंवा मासळी व इतर दिवशी अंडी किंवा मटण दिले जाते. त्याशिवाय एक भाजी, सांबार, रायते, रस्सम् व पापड! शाकाहारी लोकांना जादा भाजी दिली जाते. चार वाजता दुपारचा चहा. चहाबरोबर वडा, नान, जॅम-टोस्ट, जिलेबी, केळ्याचा जॅम, केक्स् वगैरे नित्य नवे पदार्थ दिले जातात. ती यादी कानावर पडताक्षणी जिभेला पाणी सुटते. कारण तोवर तेथील बटाटावड्याची चव जिभेवर रेंगाळत होती. तर मटण पुलाव्याचा वास कसा मस्त सुटला होता!

खलाशांचे रात्रीचे जेवण सूर्यास्तालाच (सपर) होते. कारण काम आटोपून एकतर काहीजण खेळण्यासाठी जातात. दुसरे पुष्कळसे नाविक दररोज पाळीपाळीने, परवानगीने, नागरी वस्तीत बाजार-रहाट मौजमजा, इत्यादिसाठी जात असतात. रात्रीच्या भोजनात आठवड्यातून तीन वेळा परोठे मिळतात. इतर वेळी ब्रेड किंवा ब्रेडपासून बनविलेले डिनर–रोल्स. त्याच्या जोडीला मटण, मच्छी किंवा अंडी जे काही, जसे उपलब्ध असेल, ते. शाकाहारी लोकाना दोन भाज्या मिळतात. साधारणपणे आठवड्यातून तीन चार वेळा गोड पदार्थ दिला जातो. हे सर्व सांगत असताना वत्सल मातेची झलक लेफ्ट. कमांडर जॉर्जच्या डोळ्यात चमकून गेली. आणि हा मेसचा सारा खटाटोप पहाण्यासाठी असलेल्या खास अधिकाऱ्याने आधी ते अन्न खाल्ले पाहिजे, चाखले पाहिजे, त्याला ते रुचले पाहिजे, मगच त्याचे वाटप होते. कारण अन्नासंबंधी कोणीही तक्रार केली तर आधी त्या अधिकाऱ्याला जाब विचारतात. आचारी वाढपी स्टुअर्ड्स (म्हणजे आपल्या हॉटेलातील वेटर्स) मेस्–ऑफिसर्स ही सारी मंडळी सप्लाय अँड सेक्रेटेरीएट शाखेच्या हाता-खालची असते. सप्लाय अँड सेक्रेटेरिएट ब्रँच ही नौदलाची एक स्वतंत्र ब्रँच आहे.

"काऽहो, तुमच्याकडे कट्टर शाकाहारी, उपास-तापास करणारे असतीलच?" शिवकुमारने विचारले.

"होय. पण एक सांगू? उपासाच्या भानगडीत फार करून कोणी पडत नाही. आपला हात नि जगन्नाथ म्हणून आव न ताव न पहाता खाऊन पोट बिघडले तर उपोषण हाच इलाज. तथापि तसे घडत नाही. आणि दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर असे की दर दहा खलाशांमागे चार शाकाहारी असे प्रमाण पडते. मोठ्या प्रमाणावर असे म्हणता येईल की एकतृतीयांश नाविक शाका-हारी आहेत."

"अरे हो! जेवणासंबंधी आणखी थोडीशी माहिती राहिलीच की!" लेफ्ट. कमांडर जॉर्ज उत्साहाने सांगू लागले, "आठव-ड्यातून एक वेळ सूप देण्यात येते. (सपरसंबंधी मी बोलत आहे) एरव्ही कॉफी दिली जाते. तसेच आठवड्यातून दोन तीन वेळा फळे दिली जातात. त्याशिवाय हवामानानुसार व कामाच्या ताणा-नुसार कमी अधिक प्रमाणात ज्यादा पूरक अन्न दिले जाते. उदाहरणार्थ "इंजिनरूम क्र्यू"ला दूध ज्यादा मिळते, तर पहारे-कऱ्याना चहा कॉफी अधिक मिळते. गॅली व पँट्रीच्या लोकाना उष्णतेच्या धगीत वावरावे लागते. म्हणून त्यानाही दूध दिले जाते.

## आणि मदिरेचे काय हो?

रॉयल नेव्ही व इतर काही आंतरराष्ट्रीय नौदले वगळता, अन्यत्र खलाशाना आगबोटीवर दारू पुरविली जात नाही. पैसे दिले तरीही! विवाहित खलाशांचे कुटुंब बंदरात असेल तरच मर्यादित प्रमाणात त्याला 'रम' पुरविली जाते. फ्लीट कँटिनमध्ये जाऊन मद्यपान करता येते. मात्र तेथेही कोणा सिव्हिलियन आप्ताला किंवा मित्राला नेता येत नाही. त्याला गेटबाहेरच उभे ठेवावे लागते. अधिकाऱ्याना मात्र दरमहा ठराविक कोटाप्रमाणे आगबोटीवरहि दारू विकत मिळते. मात्र त्यांच्यावरही दोन बंधने आहेत. एक तर आगबोटीवर ते "पिण्याची पार्टी" करू शकत नाहीत. पिण्याची स्पर्धा वा चढाओढ वा महेफिल रंगवू शकत नाहीत. हे सगळे लेफ्ट. कमांडर जॉर्ज सांगत असताना शिवकुमारला हसू आले ते पाहून जॉर्जने विचारले, कां हसलातसे? "तुमच्या

प्रश्नातच त्याचे उत्तर आहे" या वाक्यावर दोघेही खळाळून हसले आणि सर्दी झाली असल्याने जॉर्जला शिंकण्याची लहर लागली. अच्छा ऽआँऽऽछा: करीत दोन शिंकांचे मधेच एक्स्यूज मी म्हणत त्याने मोजून सहा शिंका दिल्या की हो!

## बल्लवाचार्यांचे शिक्षण

लेफ्ट. कमांडर जॉर्ज याने दिलेली माहिती व पोटात गेलेले चविष्ट खाद्यपदार्थ यामुळे शिवकुमारने शेवटचा प्रश्न टाकला, "तुमच्याकडे स्वयंपाकाचे शिक्षण देण्याची खास व्यवस्था आहे असे दिसते ?"

"होय तर! किंबहुना फक्त नौदलातच ती खास व्यवस्था आहे," जॉर्जने सासूच्या अधिकारवाणीने सुनावले.

नौदलातील प्राथमिक शिक्षण पूर्ण झाल्यावर मुदपाकासाठी ज्यांची निवड होते, त्याना ते शिक्षण मुंबईला "आय. एन. एस. हमला" येथे दिले जाते. 'असिस्टंट कूक' ही पहिली पायरी. ते शिक्षण तीन ते सहा महिन्यांचे असते. ते पूर्ण करून काही वर्षे नोकरी झाली, कीं पुन्हा तीन महिन्यांचे शिक्षण. मग बनतो तो कूक. स्टुअर्डस्ना फक्त सहा आठवड्यांचे शिक्षण दिले जाते. पण तेवढ्या मुदतीत ते "एक्सपर्ट" बनतात. पाश्चिमात्य पद्धतीने वेगवेगळ्या तऱ्हेने डायनिंग टेबल सजविणे हा त्या शिक्षणातील महत्वाचा भाग. आर्जव आणि मार्दव हा दुसरा तितकाच महत्वाचा घटक ! असो. थोडेसे विषयांतर झाले खरे, पण ओघात आलें म्हणून सांगितले, असा खुलासा करून जॉर्ज पुन्हा बल्लवाबाबत सांगू लागला, कूकनंतरची बढती "—लीडिंग कूक"; पेटी ऑफिसर व चीफ पेटी ऑफिसर (एस. एस.—सप्लाय अँड सेक्रेटरिएट) लीडिंग, पेटी ऑफिसर, व चीफ पेटी ऑफिसरलाही प्रत्येक बढतीचे पूर्वी 'हमला'मध्ये अनुक्रमे तीन महिने, दीड महिना व एक वर्ष मुदतीचे अभ्यासक्रम पूर्ण करावे लागतात. तेव्हा कुठे बल्लवाचार्य तयार होतात! नाविकाना सकस आहार मिळतो आणि भरल्या पोटी किंवा सुग्रास अन्नाच्या विश्वासानेही माणूस आपोआपच चांगले काम करीत रहातो. या शब्दात जॉर्जने पाकप्रशस्ती साधून घेतली. आणि ती योग्यही आहे.

●●●

### स्त्री आणि आगबोट—एक साम्य

**दोघीही प्रेक्षणीय असतात ! —दोघींचाही खर्च फार असतो !**

**दोघीनाहि रंगरंगोटी फार करावी लागते ! —दोघीहि हलत डुलत चालतात ! दोघींमध्ये आग असते ! (फार जपावं लागतं बरं ! )—दोघींचीहि सारखी भुणभुण चालू असते ! —दोघींचाहि आवाज कानठळ्या बसविणारा असतो ! — दोघींचाहि खाऱ्या पाण्याशी फार संबंध येतो ! दोघीहि कमरेखालील भाग लपवून वरील भाग दर्शनी ठेवतात ! —दोघीनाहि ताब्यात ठेवण्यासाठी माणूस तसाच 'जबरदस्त' लागतो ! —खलाशाना एकीचा कंटाळा आला कीं ते दुसरीकडे धाव घेतात ! —दोघीनाहि गति यायला वेळ लागतो, पण एकदा गति आली म्हणजे मग मात्र आवरणे महाकठिण होऊन बसते ! —आणि दोघींचेहि एक खास वैशिष्ट्य ! कधी दगा देतील त्याचा नेम नसतो ! ! —**




**"समुद्रप्रवास चालू असता बोटीवरील एखादा अधिकारी वा खलाशी मरण पावला तर त्या मेताचे काय करीत असावेत?" असा विचार तुमच्या मनात कधी आला आहे काय?**

**समुद्रात फेकून देत असतील?........ छेः छेः! भलतंच!!**

**मग?.... त्यासाठीच तर हा लेख वाचायचा!**



**नौदलातील** अधिकारी व खलाशी याना सागरी कामगिरीवर असताना आजारपण, अपघात, लढाई, अथवा नैसर्गिकरीत्या मृत्यु आला, की त्यांचे अंत्यसंस्कार सारख्याच सन्मानाने, पद्धतीने व इतमामाने पार पाडले जातात.

नाविक मृत पावल्याचा दाखला आगबोटीवरील डॉक्टर अथवा सिक-बर्थ अटेंडंटकडून दिला जातो. प्रत्येक आगबोटीवर डॉक्टर नसतो. तसेच मोठी शस्त्रक्रिया वगैरे करण्याची सोय नसते. ज्या आगबोटीवर डॉक्टर असतात त्या आगबोटीवर त्यांचे दिमतीला इतर सर्व नोकरही असतात. पण डॉक्टर नसल्यास सर्व प्रथमोपचार, प्राथमिक औषधपाणी, साधे ड्रेसिंग वगैरे जबाबदारी सिकबर्थ-अटेंडंटला पार पाडावी लागते. आणखीही एका गोष्टीचा ओघाने उल्लेख केला पाहिजे. लष्कर, आरमार व वायुसेना यांच्या वैद्यकीय उपचाराची सोय 'आर्मी मेडिकल कोअरमार्फत होते. तिन्ही दलाना डॉक्टर्स पुरविणे, ही जबाबदारी ए. एम्. सी.ची (आर्मी मेडिकल कोअर) असते. प्रत्येक डॉक्टरला तिन्ही दलात आळीपाळीने ठराविक वर्षे काढावी लागतात. तो नियम ज्युनियर ऑफिसर्स व इतर पाईकाना लागू नाही. नौदलातील सिक-बर्थ अटेंडंट म्हणजे ऑपरेशन–थिएटर-असिस्टंटच्या क्षमतेचा शिकवून तयार केलेला इसम असतो. असो.

नाविकाचा मृत्यु झाल्यानंतर तशी सूचना फलकावर काळ्या बॉर्डरच्या चौकटीत लावली जाते. आगबोटीचे स्वतःचे बंदर आणि पुढचे बंदर यानाही ती शोकवार्ता कळविली जाते. स्वतःचे बंदर याचा अर्थ असा, कीं प्रत्येक आगबोटीचे 'माहेर' ठरलेले असते. त्याला होम-पोर्ट (स्वतःचे बंदर) म्हणतात. दरम्यान दिवंगत नाविकाचा डिव्हिजनल ऑफिसर व इतर सहकारी त्या दिवंगत व्यक्तीच्या सामानाची तपशीलवार यादी करतात. ते बांधून सील करून आगबोटीच्या होल्डमध्ये (सामानाची जागा) पाठविले जाते. रोकड रक्कम आगबोटीवरील खजिनदाराकडे जमा होते. तसेच मौल्यवान वस्तूही जमा केल्या जातात. ज्या भागात वा कंपार्टमेंटमध्ये तो दिवंगत नाविक रहात असतो, ती जागा जंतूनाशक औषधाने धुवून पुसून स्वच्छ केली जाते. रात्री नाविकाचा मृत्यु घडून आला तरी शक्यतोवर दिवस उजाडेपर्यंत त्याचे अंत्यसंस्कार करीत नाहीत. त्याचे एक कारण म्हणजे शवपेटिका तयार करावी लागते. दुसरे, रात्री सर्व इतमाम नीट पार पाडणे अवघड जाते. दिवसभरात केव्हाही मृत्यु झाला तर दोन चार तासात तो विधी पूर्ण केला जातो. नौदल-निशाण ऐन अंत्यसंस्काराचे थोडा वेळ पूर्वी अर्ध्यावर उतरविले जाते. आणि सूर्यास्तापर्यंत ते तसेच ठेवले जाते. अधिकारी दिवंगत झाला असेल तर मात्र ते कळताक्षणीच निशाण खाली उतरविले जाते. आगबोटीच्या ध्वजस्तंभावर नौदलाचेच निशाण असते. राष्ट्रध्वज फक्त ठराविक वेळी, ठराविक ठिकाणी लावला जातो.

अंत्यसंस्काराची वेळ एक्झिक्युटिव्ह ऑफिसर नक्की करतो. दरम्यान शवपेटिका तयार केली जाते. ते झाल्यानंतर डिव्हिजनल ऑफिसर (त्या नाविकाच्या शाखेचा प्रमुख) समक्ष मृतदेह शवपेटिकेत अलगद ठेवला जातो. प्रत्येक धर्मातील प्रचलित रूढींप्रमाणे आत्म्याला शांति मिळावी या उद्देशाने अंगठी, क्रॉस, पैसा, कागदी फुले वगैरे त्या पेटिकेत टाकण्यात यतात. पेटीच्या खाली बिछायत

## वन्समोअर !

**एक छोटी बोट संकटात होती. त्याच वेळी त्या मार्गाने एक मोठी बोट चालली होती. छोटया बोटीचा संदेश मिळताच मोठी बोट तिला वांचविण्यासाठी धावली, पण ती वेगात असल्यामुळे चुकून छोटया बोटीवर जाऊन आदळली आणि छोटी बोट दूर फेकली गेली. सुदैवानें तडाखा सौम्य बसल्यामुळे छोटी बोट फुटली किंवा उलटली नाही. "अजून थोडा वेळ तुम्ही तरंगत राहू शकाल ना?" मोठया बोटीच्या कप्तानाने छोटया बोटीच्या कप्तानाला विचारले "जरूर जरूर !" उलट उत्तर आले. "आणखी बराच वेळ आम्ही तरंगत राहू शकू !".**

**थोड्या वेळाने मोठ्या बोटीच्या कप्तानाने बोट जवळ आणण्याचा पुन्हा एकदा प्रयत्न केला, पण पुन्हा तसाच प्रकार घडला व धडक बसून छोटी बोट दूर फेकली गेली, पण न बुडता तरंगत राहिली.**

**"अजून थोडा वेळ तुम्ही तरंगत राहू शकाल ना?" मोठया बोटीच्या कप्तानाने पुन्हा विचारले.**

**"असं वाटतं," छोटया बोटीचा कप्तान म्हणाला. "कां? पुन्हा एकदा धडक मारून पाहण्याचा विचार आहे काय?"**

असते. शव पेटीत ठेवल्यानंतर शवपेटिका बंद करतात आणि राष्ट्रध्वजात लपेटून ती अंत्यदर्शनासाठी सोयीस्कर अशा ठिकाणी ठेवतात. बहुधा ब्रिजच्या खालचे बाजूला उजव्या हातास (क्वॉर्टर डेक) एखाद्या तोफेच्या चौथऱ्यावर ती शवपेटिका ठेवली जाते. तोपर्यंत सागर-समर्पणाची वेळ होत आलेली असते. शिप्स कंपनीचे (आगबोटीवरील नाविक आणि अधिकारी) जेवढे मेस (भाग) असतात, त्या प्रत्येक भागाचे कमी अधिक प्रतिनिधी, ब्युगलर, गनरी ऑफिसर व गार्डस् हे सारे शिस्तीने उभे असतात.

डिव्हिजन–फॉल–इन झाल्याबरोबर सर्वजण प्रथम सावधान हा पवित्रा घेतात आणि नंतर विश्रममध्ये येतात. पण तो प्रसंग वेगळा असतो. त्यामुळे कोणी चुकला वा कोणी मुद्दाम चुकवून खसखस पिकवली असे होत नाही. मानवंदना-पथकाजवळच फक्त रायफल्स असतात. ते पथक एका बाजूला असते. त्याच्या अग्रभागी ब्युगलर असतो.

सर्व सिद्धता झाल्यानंतर कमांडिंग ऑफिसर (नौदल आगबोटीच्या सर्वाधिकाऱ्याला तांत्रिक परिभाषेत कमांडिंग–ऑफिसर असे म्हणतात) मंद मंद पावले टाकीत येतो. त्यावेळी आसावरीसारखे अंतःकरणाला भिडणारे सूर बँडमधून निघत असतात. सी. ओ. येताक्षणी सर्वजण सावधानचा पवित्रा घेतात. पण 'खंदे-शस्त्र' बाये-शस्त्र (प्रेझेंट आर्म्स, शोल्डर आर्म्स) हे होत नाही. शवपेटीका आगबोटीच्या कठड्याजवळ ठेवली गेलेली असते. कप्तान तिच्या उजव्या हाताला उभा असतो. डाव्या हाताला ऑफिसर्सचे प्रतिनिधी असतात. डिव्हिजनल पेटी ऑफिसर्स आपापल्या डिव्हिजनच्या उजव्या बाजूला पहिल्या क्रमांकाला उभे असतात.

कप्तान जागेवर आल्यानंतर विश्रम दिले जाते. नौदल प्रार्थना पुस्तकातील एखादा उतारा कप्तान वाचून दाखवितो. त्याबरहुकूम सारेजण नतमस्तक होऊन ती प्रार्थना म्हणतात. त्यानंतर "सावधान" ही आज्ञा होताच कप्तानासह सर्वजण अॅटेंन्शन्‌मध्ये येतात. त्यावेळी शवपेटिका बोटीच्या कठड्यावर हुक्सच्या साहाय्याने उचलून ठेवली जाते. तिला दोऱ्यांच्या तणावाचा आधार दिलेला असतो. दोऱ्यांचे ते जाळे समुद्राच्या दिशेने कलते करता येईल असेच गुंफलेले असते. त्या पोझिशनमधे शवपेटिका ठेवण्यात आली की तिला खांदा देणारे चौघेजण तेथेच चारही कोपऱ्याना उभे राहतात.

प्रार्थना धीर गंभीर सुरात संपते. "माती असशी, माती होशी..." अशा आशयाच्या गीताने कप्तान प्रार्थना संपवितो. त्याक्षणी 'सावधान'ची आज्ञा मिळते. इंजिनांची धडधड बंद पडते. बोट स्तब्ध उभी राहते. फार तर हलकेच मागे पुढे हेलकावते. त्यावेळी शस्त्रास्त्रधारी पथक रायफल उलटी करून अखेरची वंदना देतात. ब्युगलवर 'लास्ट पोस्ट' वाजतो. त्याच क्षणी रायफलच्या तीन व्हॉलीज उडविल्या जातात. कप्तान व इतर सर्वच वंदनेच्या पोजमधे (सॅल्यूट) उभे असतात. आणि त्या शववाहिकेला खांदा देणारे चौघे दुःखी जीव हलकेच ती पेटी रत्नाकराचे स्वाधीन करतात. शवपेटिका समुद्रात फेकली जात नाही. हलक्या हाताने दोराच्या तणाव्याने सोडली जाते. सारे काही दोन मिनिटात आटोपते. तोपर्यंत सर्वच ताठ व मानवंदनेच्या अवस्थेत उभे असतात. "बॉडी कमिटेड टु डेप्थ" असे त्या शवपेटिकावाहकांच्या प्रमुखाने सांगितल्यानंतर मग सॅल्यूटसाठी गेलेले हात खाली येतात. परत सारेजण अॅटेन्शन्‌ला येतात. कप्तान दृष्टिबाहेर गेल्यानंतर कंपनी डिव्हिजन्सप्रमाणे डिसमिस केली जाते. आणि सारेच व्यथित अंतःकरणाने आपापल्या जागी परत जातात.

काही घटिका अशा उलटतात. भावनांचा उद्रेक कमी होतो. काही तासापूर्वी मित्रवियोगाने ढसढसा रडणारा त्याचा सोबती वॉच-ड्युटीवर येतो. आणि वॉच-ड्युटीवरील त्या सख्याला आठवतात उर्दू कवितेच्या दोन ओळी–

**खुमुशियोंका राज है।**
**तख्त है न ताज है।।**

या घटकेला राज्य आहे ना सिंहासनाचे, ना राजमुकुटाचे. साम्राज्य आहे ते शांतीचेच. ●●●

[टीपः—किनाऱ्यावरील संस्थांमध्ये ड्यूटीवर असताना मृत्यु आला, तर संपूर्ण लष्करी इतमामाने दहन वा दफनविधी पार पडतो.]








# आधुनिक आरमार

युद्धनौका, विनाशिका, विमानवाहिका, डेप्थचार्ज, टॉर्पेडो, पाणबुडी, पाणसुरंग यांच्या साह्याने सागरी युद्ध खेळले जाते...
त्या संरक्षक तितक्याच संहारक शस्त्रास्त्रसांभाराची रूपरेषा

## कमोडोर जे. एस. मेहरा

**चीफ-स्टाफ ऑफिसर-इंडियन फ्लीट यानी रेखाटली आहे.**

**दुसऱ्या महायुद्धात भारतीय नौदलातील 'बंगाल' या छोटया युद्धनौकेने ब्रह्मदेशाच्या सागरी हद्दीत एक प्रचंड जपानी युद्धनौका बुडविली. त्यावेळी कमोडोर मेहरा 'बंगालचे' सेकंड-इन्-कमांड होते. त्याना त्या बहादुरीबद्दल सन्मान निदर्शक पदकही मिळालेले आहे.**

**दुसऱ्या** महायुद्धातील प्रबल नौसेना म्हणजे ब्रिटिश, अमेरिकन, जर्मन व जपानी होत. बॅटल शिप्स् (युद्धनौका), एअरक्रॅफ्ट-कॅरियर्स (विमानवाहू नौका) बॅटल- क्रुझर्स (युद्ध नौका) क्रुझर्स (तोफानी सुसज्ज हलक्या युद्धनौका), डिस्ट्रॉयर्स, (विनाशिका) व सब्मरिन्स् (पाणबुडया) ही त्यांची प्रमुख संहारशक्ति होती. त्याशिवाय फ्रिगेट्स्, माईन-स्वीपर्स (पाणसुरुंग काढणाऱ्या) माईन-लेयर्स (पाणसुरुंग पेरणाऱ्या) असत. ट्रॉलर्स कॉर्व्हेटस या नौका पहारा व संरक्षणासाठी (एस्कॉर्ट) वापरल्या जात असत.

**बॅटलशिप्स**-वजनाने सर्वात भारी, वेग त्या मानाने कमी, जाड पत्र्याने मढविलेल्या असत. त्यामुळे त्यांचा नाश करणे कठिण कर्म होते. बॅटलशिप्सवर साधारणपणे दीड-दोन हजार खलाशी असत. इतर युद्ध-नौका त्यामानाने मध्यम वा हलक्या परंतु जलद गतीच्या असत. त्यापैकी फ्रिगेटस् व क्रुझर्सवरती विमान-विरोधक तोफाही असत. त्यांच्या शिवाय ट्रुप-कॅरियर्स व हॉस्पिट्ल-शिप्सही होती.

१९३९ ते ४२ पर्यंत ॲटलांटिक महासागरात जर्मन पाणबुड्यानी अक्षरशः थैमान घातले होते. १९४३ च्या पूर्वार्धापर्यंत ती स्थिती कायम होती. त्याला दोन कारणे होती. एकतर पाणसुरुंगाचा शोध घेऊन नाश करणारी यंत्रे नव्हती. दुसरे पाणबुडीचाही तपास लावणारी यंत्रे वापरात नव्हती. पण १९४३ च्या पूर्वार्धाचे अखेरीस ती दोन्ही तंत्रे दोस्तांच्या आरमारांनी आत्मसात केल्याने हळुहळू पण निश्चितपणे युद्धाला कलाटणी मिळाली.

१९४३ मध्ये पहिल्या प्रथम जी यंत्रे आली ती पाणसुरुंगांचा वेध घेणारी. त्यामुळे जलप्रवासाच्या मार्गात पेरलेल्या पाणसुरुंगाचा विध्वंस करून सागर खुला करणे सुलभ झाले. त्यानंतर 'रडार'चा वापर सुरू झाला त्यामुळे शत्रुची बाँबर्स हल्ला करण्यासाठी येऊ लागली, की त्यांची दिशा, वेग, अंतर अचूक कळू लागले व त्यांचा समाचार घेणे सहज शक्य झाले. त्यांच्या पाठोपाठ 'ॲसडिक' व 'सोनार' सेट्स वापरात आले. त्यामुळे पाणबुडीचा पत्ताही लागत असे. आणि खऱ्या अर्थाने क्रुझरचा वा आगबोटीचा कप्तान व पाणबुडीचा कप्तान यांच्या बौद्धिक कर्तबगारीने युद्ध खेळले जाऊ लागले.








अनुक्रमणिका

परिणामतः जर्मन व जपानी पाणबुड्या तसेच लांब पल्ल्याची किंवा विमानवाहू नौकांच्या विमानांची गच्छंति वाढत्या प्रमाणात झाली. आणि महायुद्धाच्या पहिल्या तीन वर्षांत जवळजवळ गमावलेले नाविक सामर्थ्य पुन्हा एकदा दोस्तांच्या हाती आले व ते उत्तरोत्तर वाढत गेले. दोस्तांच्या विजयात या उत्क्रांतीचा फार मोठा वाटा आहे.

युद्धोत्तर काळात लढाऊ आगबोटींची रचना व स्वरुप यात झपाटयाने फरक पडत आहे. आज काही राष्ट्रांपाशी अणुशक्तीने चालणाऱ्या विनाशिका, विमानवाहिका व पाणबुड्या आहेत. तथापि आशियापुरते पाहिल्यास त्यावद्दल फारसा विचार करणे सध्या शक्य नाही. सुवेझ कालव्याच्या पूर्वेपासून तो जपानपर्यंत अजूनहि परंपरागत लढाऊ साधनांचे महत्व कायम आहे. कारण अणुशक्तीवर चालणारी पाणबुडी तयार करणे दूरच. विकत घेणेसुद्धा पौर्वात्य राष्ट्रांच्या आटोक्याबाहेर आहे. असो.

**सागरी युद्धातील गतिमानता**

हल्ली हलक्या वजनाची पण जलद गतीची लढाऊ आगबोट निर्माण करण्यावर जास्त भर दिला जातो. त्या आगबोटीवर इलेक्ट्रॉनिक्स, रडार वगैरे शास्त्रांच्या साह्याने वापरात येणारी "सॉफिस्टिकेटेड्" शस्त्रास्त्रे वसविण्यात येतात. त्यांचे कारण असे की या अणु-युगात अल्प-सुचनेने सबंध काफिला झटकन् सर्वत्र विखुरता आला पाहिजे. तसे करण्याने कमीत कमी आगबोटींचा नाश होतो. रशियाने या तंत्रावर अधिक भर दिला आहे.

याउलट अमेरिकेचा सारा भर अणुशक्तिवर चालणाऱ्या प्रचंड विमानवाहू नौकांवर व पाणबुड्यांवर आहे. कारण त्या विमानवाहू नौकांवर दूर लांब पल्ल्याची बॉंबर्स व फायटर्स ठेवल्याने समुद्रातून उड्डाण करून थेट शत्रु प्रदेशातही विध्वंस करता येतो. त्याला तोड म्हणून पाणबुडी, तसेच पाण्याच्या खालून विध्वंस करणाऱ्या साधनांच्या विकासावर रशियाने भर दिला आहे.

तर चिनी आरमारात पाणबुड्यांवर अधिक भर देण्यात आलेला आहे. इतर लढाऊ आगबोटींपेक्षा पाणबुड्यांची संख्या चीनकडे जास्त आहे. इंडोनिशियाजवळील आरमारात काही चिनी पाणबुड्या व इतर काही राष्ट्रांकडून मिळविलेल्या लढाऊ आगबोटी आहेत. पण इंडोनिशियाचे नौदल ही 'शक्ति' (पॉवर) गणली जात नाही. रहाता राहिले पाकिस्तान, भारत, व सिलोन पैकी सिलोनचा क्रमांक इंडोनिशियानंतरचा आहे. पाकिस्तानी नौदलाची रचना ही कमीअधिक प्रमाणात भारतीय नौदलासारखीच आहे. आणि भारतीय नौदलाचे स्वरुप शाही नौदलासारखे निदान प्रारंभी तरी होते.

भारताच्या पश्चिमेकडील इतर राष्ट्रांपैकी इजिप्तचे नौदल पुष्कळच आधुनिक व रशियन युद्ध नौकांनी समृद्ध आहे. डिस्ट्रॉयर व फास्ट-टॉर्पेडो बोट्स यांचा भरणा त्यात अधिक आहे. ब्रिटीश आरमाराचेही स्वरुप झपाटयाने बदलत आहे. फ्रिगेट्स् व अणुशक्तियुक्त पाणबुड्या वाढत्या संख्येने ठेवण्याचे दृष्टिने त्यांची पावले पडत आहेत. आता प्रत्येक विशिष्ट लढाऊ आगबोटीची माहिती करून घेऊया.

क्रमशः--शत्रुच्या किनाऱ्यावर उतरून



नौदल-दिनानिमित्त शृंगारलेली युद्धनौका आय्. एन्. एस्. म्हैसूर.

हल्ला चढवून तो व्यापणाचे काम करणाऱ्या पथकांना 'मरीन्स' म्हणतात. छोट्या प्रमाणात त्यानाच "लँडिंग पार्टीज" असे नाव दिलेले आहे. समजा मुंबईपासून पन्नास मलांवरील एका बेटावर मरीन्सना उतरावयाचे आहे. त्याची सर्व पूर्वतयारी झालेली आहे. व मरीन्सना घेऊन जाणारी लँडिंग शिप्स तयार आहेत. मग काय होते? प्रत्यक्ष लँडिंग पूर्वी योजनेनुसार त्या बेटावर लांब पल्ल्याच्या तोफानी भडिमार करण्यात येतो. प्रसंगी धुराचे पटल उभे करण्यात येते. पाण्याची खोली, भरती ओहोटी, शत्रूचा धोका हे सर्व लक्षात घेऊन लँडिंग-शिप्स किनाऱ्यापासून आवश्यक त्या अंतरावर उभ्या असतात. मरीन्स ठराविक पद्धतीने, ठराविक गतीने भराभर उतरून किनाऱ्याकडे नावा वल्हवित असतात. अशावेळी संरक्षण देणे तसेच एरव्ही व्यापारी आगबोटींचे संरक्षण करणे (एस्कॉर्ट) हे क्रूझरचे काम असते. क्रूझर्सचेही अनेक प्रकार उपप्रकार आहेत. सर्वसाधारणपणे एका क्रूझर्सचे वजन (निव्वळ वजन डी. डब्ल्यू. टी. टी.) बारा हजार टन असते. लांबी ५६० फूट व रुंदी ६४ फूट, आणि वेग ताशी बत्तीस नॉट असतो (खुष्कीचा सव्वामैल म्हणजे सागरातील एक मैल—एक नॉट) क्रूझर्सचा कमाल वेग चाळीस नॉट्सपर्यंत नोंदलेला आहे. एका क्रूझरमध्ये सातशे ते आठशे जणांची "शिप्स कंपनी" असते. (अधिकारी व खलाशी यांना शिप्स कंपनी असे संबोधले जाते). क्रूझर्सवरती सर्वसाधारणपणे सहा इंची तोफा असतात. तसेच चार इंची विमानवेधक तोफाही असतात. त्याशिवाय बोफोर्स व इतर छोट्या तोफाही, मशिनगन्स वगैरे असतात. त्यांची "फायरिंग रेंज" दोन ते पाच मैलपर्यंत असते.

**फ्रिगेट्स:**—दुसऱ्या महायुद्धानंतर बांधण्यात आलेली फ्रिगेट्स ही खऱ्या अर्थाने त्या युद्धातील विनाशिकांचे काम करतात. फरक एवढाच की व्यापक हालचाल आणि वेग (मनुव्हरींग अँड स्पीड) याबाबत फ्रिगेट्सनी आघाडी मारली आहे. तथापी नाना तऱ्हेच्या अत्याधुनिक शस्त्रसांभारामुळे ती फुगीर दिसतात. त्यांना 'ढेरपोटी' म्हणण्यास काहीच हरकत नाही. फ्रिगेटचे वजन (डी-डब्ल्यूटी-) दोन ते तीन हजार टन असते. लांबी ३६० फूट, रुंदी ४५ फूट-वेग २५ ते २७ नॉट्स् असतो. शस्त्रसांभारात ४.५ इंचाच्या 'हायव्हेलॉसिटी' तोफा शत्रूचा धुव्वा उडवितात. त्याशिवाय विमानांचा समाचार घेण्यासाठी चाळीस मिलिमिटर बोफोर-गन्स् सिद्ध असतात.

पाणबुडीचा नाश करण्यासाठी फ्रिगेटवर "लिंबो" (डेप्थचार्ज) टघुब्जही असतात. अचूक नेम धरून डेप्थचार्ज सोडल्यास दोन ते अडीच मैल खोल असलेल्या पाणबुडीचाहि सत्यानाश होतो. अलिकडे "लिंबो"चा मारा करण्यासाठी हेलिकॉप्टर्सचाहि वापर केला जातो. फ्रिगेटवरून त्या हेलिकॉप्टरला पाणबुडीची दिशा, तिचा वेग व तिचे स्थान क्षणार्धात कळविले जाते. त्याप्रमाणे "लिंबो" टाकले जातात. आणि पाणबुडी पाण्याखाली असल्याने त्या हेलिकॉप्टरलाही धोका नसतो. दुसऱ्या महायुद्धातील बहुतेक सर्व विनाशिका आता फ्रिगेट्स बनल्या आहेत. किंबहुना आधुनिक नौदलाचा तो कणा बनला आहे. कारण दर्यावर आणि दर्याखालीही दडलेल्या शत्रूचा यथायोग्य समाचार फ्रिगेटच घेऊ शकते.

**माइन-स्वीपर्स:**—गनिमाच्या आगबोटी बुडविण्यासाठी जलमार्गात पाणसुरुंग पेरणे हे नौदल युद्धातले एक तंत्र आहे. ते पाणसुरुंग उपसून निष्प्रभ करणे अथवा नष्ट करणे हे माइन-स्वीपर्सचे काम आहे. पाणसुरुंगांचा सर्वांना माहित असलेला परंपरागत प्रकार म्हणजे समुद्राच्या तळाशी दडणारा पाणसुरुंग. तो एक मला मोठा लोखंडी गोल असतो. त्याच्या पोटात स्फोटक द्रव्ये भरलेली असतात. त्याला १५-२० फूट लांबीची तार जोडलेली असते. ती पाण्याच्या पृष्ठभागाखाली असते, व लोहचुंबकीयही असते. पाणसुरुंगाच्या पोटात २००० पौंड टी-एन-टी

## ही नस्ती उठाठेव कशासाठी ?

एका नवीन भूप्रदेशावर उतरण्यापूर्वी कप्तान खलाशांना सूचना देत होता —"जिथे पाणथळ भाग आहे तिथे शार्क मासे, विषारी मासे, मोठमोठे खेकडे, प्रवाळाचे खडक आहेत. जमिनीवर महारोग, टायफॉईड, डेंग्यू, मलेरिया वगैरे रोग आणि भयंकर विषारी असे साप, मोठमोठ्या विषारी माशा, सरडे, वगैरे आहेत. बेटावर उतरल्यावर कुणीहि काहीहि खाऊ नका, पाणी पिऊ नका. कुणी माणूस दिसलाच तर जवळ जाऊ नका.—कुणाला काही शंका विचारायची आहे?"

"हो," एक खलाशी म्हणाला. "त्या बेटावर नाही उतरलो आपण, तर चालणार नाही का?"

(स्फोटक पदार्थ) भरलेले असते. आगबोटीच्या तळापैकी कोणत्याही भागाचा त्या तारेला स्पर्श झाला की आगबोट त्या पाणसुरुंगाच्या क्षेत्रात खेचली जाते. आणि पाणसुरुंग–तंत्रानुसार त्यांचा स्फोट होऊन आगबोटीच्या ठिकऱ्या उडतात. किमानपक्षी भले मोठे भगदाड पडून त्यातून हजारो गॅलन पाणी आत घुसते, व बघता बघता बोट रसातळाला जाते.

त्या पाणसुरुंगांचा धोका नष्ट करण्यासाठी माइन–स्वीपर्सचा वापर केला जातो. त्यासाठी नांगरासारखे लोखंडी जाळे वापरले जाते. ते नांगर त्या पाणसुरुंगाला असणारी तार कापून टाकतात, ती तारही त्या जाळ्यात गुरफटते. ती वर खेचण्यात येते. त्यामुळे पाणसुरुंग बुडून निरुपयोगी बनतो. पाणसुरुंगाचा वापर निष्प्रभ ठरल्यास बंदरांच्या वा खाड्यांच्या तोंडात ड्रॅग–नेट पसरले जाते. विशेषतः उथळ पाण्यात ते फार उपयोगी ठरते. ज्यावेळी आगबोट त्या ड्रॅगनेटच्या क्षेत्रातून जाऊ लागते त्यावेळी रिंगसॉ किंवा मॅग्नटिक-फील्डने ड्रॅग नेटमधील गळाचे आमिष बनलेल्या चार्जचा स्फोट होऊन बोटीच्या ठिकऱ्या उडतात. त्यावर तोडगा असा काढण्यात आला की आगबोटीचा समुद्रात बुडणारा जो भाग होता त्याला पूर्णपणे लाकडी आवरण बसविण्यात आले. त्यामुळे मॅग्नेटिक फील्ड निर्माण होण्याचा प्रश्नच मिटला.

माईन–स्वीपींगची आणखी एक पद्धत आहे ती म्हणजे काही विशिष्ट लांबीची तार माईन-स्वीपर्सच्या मागे मागे खेचली जाते. तिच्यात अतिशय प्रचंड व्होल्टेजचा विद्युतप्रवाह निर्माण केला जातो. त्यामुळे निर्माण होणाऱ्या मॅग्नेटिक फील्डकडे पाणसुरुंगाच्या तारा खेचल्या जातात. आणि स्वाभाविकच त्यांचा स्फोट होतो. अशाप्रकारे मार्ग निर्वेध बनतो. "डिलेड माईन्स"चा (विलंबित स्फोट होणारे पाणसुरुंग) नाश करण्यासाठी अजूनही ती पद्धत वापरली जाते. अँटि–मॅग्नेटिक व अँटि–अकौस्टिक असेही पाणसुरुंगाचे प्रकार आहेत. त्यांचाही नाश काही विशिष्ट तऱ्हेने, पण काट्याने काटा काढणे, याच न्यायाने केला जातो.

पाणसुरुंग काढण्याप्रमाणे पेरण्याचेही एक तंत्र आहे. एकतर त्यासाठी खास बनावटीच्या आगबोटी वापरतात. किंवा पाणबुड्यांचाही वापर केला जातो. तसे पाहिले तर कोणतीही आगबोट ते काम करू शकते.

**पाणबुडीः**—पाणबुडीचे साधारण "डेड वेट" १५० ते १८० टन असते. लांबी ६०–७० फूट, रुंदी ३५ ते ३७ फूट व वेग १४ ते १५ नॉट इतका असतो. युद्धशास्त्राच्या दृष्टीने विचार करता आण्विक पाणबुडीपेक्षा साधी पाणबुडी अधिक पसंत केली जाते. कारण ती चटकन अदृश्य होऊ शकते. आण्विक पाणबुडीचे वजन १२०० टन असते, लांबी ६० फूट व रुंदी २६ ते २७ फूट असते. तिचा पाण्यावरील वेग १५ ते २० नॉट, व जलांतरीचा (सबमर्जड्) वेग ७ ते ८ नॉट असतो. या दोन्ही प्रकारच्या पाणबुड्यांचे मुख्य अस्त्र म्हणजे टॉर्पेडो. दोन इंच डायामिटरच्या ट्यूब्जमधून टॉर्पेडो उडविले जातात. त्याना टॉर्पेडो ट्युब्ज म्हणतात. साधारणपणे एका दौऱ्यावर एक पाणबुडी पंचवीस टॉर्पेडो घेऊन निघते. जलपृष्ठावर लढण्याची वेळ आली तर चार इंची गनचा वापर केला जातो. पाणबुडी बुडताना पाणी भरून घेते. त्याना बॅलस्ट टँक्स् म्हणतात. ठराविक हिशोबाने—बुडण्यासाठी आवश्यक तो दाब निर्माण झाला की ती हळूहळू खाली जाउ लागते. तिचा पेरिस्कोपही आत घेतला जातो. वर यावयाच्या वेळी ते पाणी सोडून दिले जाते. पाणबुडी हलकी होऊन हळूहळू वर येते. जलांतरी वावरताना 'सोनार' सेटवर आसपास असलेल्या आगबोटीच्या प्रॉपेलरच्या ध्वनीलहरींची नोंद होते. तर अँसिडिक सेट असल्यास त्याच्या पडद्यावर ठिपका उमटतो. मग पेरिस्कोप झटकन वर करून क्षणार्धात टेहेळणी होते. डोळ्याचे पाते लवते न लवते तोच पेरिस्कोप गडप होतो व पाणबुडी पुढल्या उद्योगाला लागते. त्यात कधी यश मिळते. कधी मारही खावा लागतो. ते सर्व अनेक गोष्टींवर अवलंबून असते. पण यशाची बाजू अधिक असते. कारण दुश्मनाच्या लढाऊ बोटीला पाणबुडीचा ठावठिकाणा घेत घेत हालचाली कराव्या लागतात. त्यात वेळ हा मोडतोच. उदाहरणार्थ ३६० फूट लांबीची एक फ्रिगेट जेव्हा पूर्ण गिरकी घेते तेव्हा निदान दोन मिनिटे जातात. तेवढ्या वेळात तिचा घात करणे पाणबुडीला सहज शक्य होते. सारांश दोन्ही कप्तानांची लायकी, त्यांचा अनुभव आणि दैव यांची अनुकूलता लाभण्यावरच पाणबुडीचा सत्यानाश होतो. एरव्ही ते सोपे नसते.

असा आहे हा संरक्षक तसाच प्राणघातक संहारक खेळ ! आणि त्याची ही साधने !

●●●



अनुक्रमणिका







नाविकांची नौकायान–स्पर्धा



# नौदलांतील समारंभ सोहळे

**समारंभ फक्त शाळा–कॉलेजातच साजरे केले जातात आणि नौदलात मात्र नेहमी रुक्ष वातावरण असते, तेथे खलाशांना नेहमी कामातच गढून राहावे लागते, बोटीवर समारंभ साजरे केले जातच नाहीत अशी आपली कल्पना आहे काय? वरुणाचा दरबार, चेंज ऑफ कमांड, होल्डिंग डिव्हिजन्स वगैरे समारंभांची मनोरंजक माहिती—**

लेफ्ट. कमांडर
एस्. एस्. कुमार

**वरुणाचा दरबार :–** व्यापारी सागरी वाहतूक करणाऱ्या आगबोटी विशेषत्त्वाने हा सण साजरा करतात. आरमारातही तो पाळला जातो. पण आरमारी बोटींवर बायका नसल्याने त्यातील रंगत पुष्कळच विटलेली असते. मग काही खलाशाना महिला बनविले जाते व सण साजरा केला जातो.

ग्रीक पुराणानुसार नेपच्यून (वरुण) हा 'जलसम्राट' मानला जातो. त्याचे आशिर्वाद आगबोटीवरील नवागताना मिळावेत, एवढ्यासाठी तो सण साजरा करतात. पण त्यालाही काही विशिष्ट संधी यावी लागते. ती अशी की विषुव-वृत्त ओलांडतानाच फक्त तो सण साजरा करतात.

ज्या दिवशी आगबोट पृथ्वीच्या कटीबंधावरून गुजरते त्याच दिवशी तो सोहळा होतो. "नेपच्यूनचा दरबार" असे त्या सणाला म्हणतात. बोटीच्या अधिकाऱ्यांपैकी एकाला 'नेपच्यून–राजा' बनवितात. इतर काही मंडळी त्याचे दरबारातील मानकरी बनतात. नेपच्यूनची व दरबाऱ्यांची वेषभूषा शक्य तितकी प्राचीन स्वरुपाची बनविली जाते. नेपच्यूनचा महाअमात्य असतो एक न्हावी. त्या न्हाव्याजवळ वस्तरा कात्री वगैरे सगळी हत्यारे असतात. तसेच गदा आणि त्रिशूळ ही नेपच्यूनची आयुधेही त्यालाच संभाळावी लागतात. दरबार भरत आहे असा पुकारा होताक्षणी आगबोटीवरील स्विमिंग पुलापासच्या मोकळ्या जागेत सर्व स्त्रीपुरुष–मुलेबाळे जमा होतात. त्यापैकी ज्या मंडळीनी आगबोटीनी विषुववृत्त ओलांडलेले नसते, त्यांचा गट पुढे बसविण्यात येतो. सगळी मंडळी स्थानापन्न झाली की नेपच्यून महाराजांच्या आगमनाची वर्दी दिली जाते. मागेपुढे दरबारी, डाव्या हाताला महाअमात्य अशा थाटात नेपच्यूनची स्वारी दरबारात प्रवेश करते. राजाला खडी ताजीम मिळते. न्हाव्याच्या हातातला त्रिशूळ नेपच्यून हातात घेतो व तो उंचावून बसण्याची परवानगी देतो. त्यानंतर एकेका नवागताचे नाव पुकारले जाते. ती व्यक्ति भले स्त्री असो वा पुरुष, उठून राजासमोर जाऊन सलाम करते; व. नम्रपणे उभी रहाते. महाअमात्य हातातल्या वस्तऱ्याने आणि कात्रीने त्यांचे मुंडण करतात. नेपच्यून महाराज आपला त्रिशूळ त्याच्या डोक्यावरून फिरवितात. ते झाले रे झाले की दरबारी मंडळी त्या व्यक्तीला उचलून स्विमींग पूलमधे अक्षरशः फेकतात. अशा तऱ्हेने सर्वाना यथासांग दीक्षा दिली जाते. नवागतांचे कपडे पाण्याने निथळतच असतात. सर्व नवागत पावन होईपर्यंत तो जल्लोष चालू असतो. नंतर सर्व दरबारी मंडळी नेपच्यूनलाही खांद्यावरून मिरवत नेऊन त्या हौदात बुडवितात. त्या रात्री आगबोटीवर मेजवानी व नृत्याचाही कार्यक्रम होतो. अशा प्रकारे जवळजवळ चोवीस तास आगबोटींवर एक वेगळेच वातावरण निर्माण केले जाते. त्यामुळे खलाशी तसेच प्रवासी यांच्या सफरीतील तोच तो पणा कमी होतो. नवीन उत्साहाने खलाशी कामास लागतात. तर प्रवाशाना तो विषय सफर आटोपेपर्यंत पुरतो.

**होल्डिंग डिव्हिजन्स:–** प्रत्येक आगबोटीवरील सर्व खलांशाचे जे गट पाडले जातात त्याना डिव्हिजन्स म्हणतात. प्रत्येक डिव्हिजनचा प्रमुख एक कमिशन्ड ऑफिसर असतो. साधारणपणे महिन्यातून एकदा साऱ्या डिव्हिजन्सची पहाणी कप्तान करतात. प्रत्येक डिव्हिजनसमोर कप्तान आले की त्याना मानवंदना दिली जाते.

त्या डिव्हिजनमधील नाविकाना प्रशस्तिपत्रके देणे, मेडल्स देणे, त्यांना बढती मिळाल्यास बढतीची फीत लावणे हे सारे कप्तानसाहेब करतात. त्यामुळे सर्व नाविक ह्यांच्या डोळ्याखालून नेमाने जातात. आणि निदान

जोवर त्या नाविकाचा ड्राफ्ट (नेमणूक) अन्य आगबोटीवर होत नाही, किंवा ते स्वत: बदलले जात नाहीत, तोपर्यंत कप्तान चेहेऱ्याने तरी आपल्या रेट्ना (नाविक). ओळखू शकतो. प्रत्येक खलाशाची नावानिशी ओळख ठेवणाऱ्या कप्तानाचा दरारा भलताच बसतो.

## चेंज ऑफ कमांड

प्रत्येक आगबोटीच्या कमांडिंग–ऑफिसरची बदली साधारणपणे तीन वर्षांनी होते. अधिकाररसूत्रे दुसऱ्याचे हाती सोपविण्याचे आदल्या रात्री आगबोटीवरून जाणाऱ्या कप्तानाला अधिकाऱ्यांतर्फे थाटाची मेजवानी देण्यात येते. तो सबंध दिवस कप्तान व एक्झिक्युटिव्ह ऑफिसर यांचे दृष्टीने फार महत्त्वाचा व गडबडीचा असतो. सुमारे पाचशेजणांचे जीवन काही तासांतच दुसऱ्याच्या हातात सोपवावयाचे असते. अनेक सुरगाठी–निरगाठी त्या दिवशी उकलावयाच्या असतात. एका प्रकारे सारी निरवानिरव करावयाची असते. ते सारे आटोपेपर्यंत केव्हाच सायंकाळ होते. मग जेवणाचा थाट !

दुसऱ्या दिवशी सकाळी नियोजित कमांडिंग–ऑफिसर साहेबाना आणण्यासाठी आगबोटीवरील एक अधिकारी मोटार लाँच घेऊन किनाऱ्याकडे जातो. दरम्यान साऱ्या डिव्हिजन्स सेरेमोनियल ड्रेसमध्ये क्वॉर्टर डेकवर उभ्या असतात. शिप्स-कंपनीतील ऑफिसर्स एका बाजूला उभे असतात. डिव्हिजनच्या सर्वात पुढे बँड व ब्युगलर्स असतात. नवीन कमांडिंग–



**उमेदवार–**

**एका उमेदवाराची**
**'खूण' होती बोट**
**बुडाले डिपॉझिट.**
**पाण्यात गेले व्होट.**

**–ह. शि. खरात**

ऑफिसरला घेऊन लाँच आली, (ती कमांडिंग–ऑफिसरची खास लाँच असते) की पाईप वाजवून त्यांचे स्वागत केले जाते. त्यानंतर तो अधिकारी कठडा चढून आगबोटीवर येतो. आणि क्वॉर्टर डेकला सॅल्यूट ठोकतो. तेथे कप्तान साहेब तो सॅल्यूट स्वीकारतात. नंतर दोघे जण संयुक्तपणे डिव्हिजन्सची पहाणी करतात. बोटीवरील अधिकाऱ्यांचा परिचय नवीन अधिकाऱ्याला करून दिला जातो. नंतर दोघे कप्तान व मागोमाग एक्झिक्युटिव्ह आणि एड्स् कप्तानांच्या केबिनपर्यंत जातात. तेथून फक्त दोघे कप्तानच केबिनमधे प्रवेश करतात. केबिन बंद होते. चाव्या, महत्त्वाचे कागदपत्र यांची अदलाबदल होते. काही तातडीची, पण तितकीच गुप्त बाब असल्यास त्याचीही कल्पना दिली, घेतली जाते. दोघे सुपरिचित असतातच बहुधा. मग दोघेही मिळून बाहेर येतात. डिव्हिजन्स अटेन्शनमधे येतात. क्वॉर्टरडेकवर सॅल्यूट काढून जुने कप्तानसाहेब त्याच लाँचमधून किनाऱ्याकडे यावयास निघतात. लाँच सुरू होण्यापूर्वी ते पुन्हा क्वॉर्टर डेकला सॅल्यूट ठोकतात. "ऽ ऽ ऽ जय ऽ वा हुर्री" अशी घोषणा त्रिवार घुमते. लाँच धक्क्याला लागते. तेथे एक जीप उभी असतेच. तीत बसून कप्तान नवीन ठिकाणी जाण्यासाठी निघतात. नवागत कप्तानसाहेबांचे राज्य लगेच सुरू होते. कारभार हाती घेतल्याचा संदेश ते लगेच पाठवितात. नंतर त्या घाईगर्दीतही डिव्हिजनसमोर शब्द दोन शब्द बोलणे हे त्यांच्या मर्जीवर अवलंबून असते. लाँच किनाऱ्यावरून परतली की लगेच कप्तान साहेब अधिकृत भेटीगाठीच्या कार्यक्रमाना सुरवात करतात. त्या भेटीगाठी औपचारिक स्वरुपाच्या असतात. वरिष्ठांची तशीच सारख्याच दर्जाच्या अन्य अधिकाऱ्यांची ओळख व्हावी, एवढाच त्यातील आशय असतो. दुसरा दिवस उजाडतो तोच मुळी वेगळा आशय घेऊन कालचक्राचे रहाटगाडगे चालूच राहते.




या सणांव्यतिरिक्त डिसेंबर महिन्यात "नौदल-सप्ताह" साजरा केला जातो. त्याचप्रमाणें इतर आपले नेहमीचे सणहि– स्वातंत्र्य दिन, प्रजासत्ताक दिन, वर्षारंभ दिन (न्यू इअर डे), वगैरे— साजरे करण्यांत येतात. स्वातंत्र्य आणि प्रजासत्ताक दिनाचे दिवशी अधिकारी व खलाशी यांचे जेवण एकत्रच शिजविले जाते. त्याला 'बडा खाना' असे म्हणतात. सायंकाळी नाविकाना जास्तीत जास्त स्वातंत्र्य दिले जाते. प्रजासत्ताक दिनाचे रात्री रोषणाई केली जाते. आगबोटी समुद्रात असतांना हे दिवस आल्यास ते थोड्या फार फरकाने तसेच साजरे केले जातात.

●●●





अनुक्रमणिका

# पन्नास आगबोटी नि एक पाणबुडी

लांडगा कळपात शिरला .... मेंढरांची पळापळ सुरू झाली ....काही बळी पडली तर काही वेदनांनी तडफडली.

सिग्नलर अँड्र्यूज यांनी 'नर्मदा' या युद्धनौकेवर असताना अनुभवलेली जीवनमरणाच्या अशाश्वततेची हकीकत.

**तेच सिग्नलर अँड्र्यूज अगदी अलिकडे कमांडर या हुद्यावर तसेच "आंग्रे" या नेव्हल बॅरक्सचे प्रमुख होते.**

**दुसऱ्या** महायुद्धातील जर्मन पाणबुड्यांच्या प्रत्यक्ष हल्ल्यातून सहीसलामत बचावलेल्या अनेक खलाशांपैकी मी एक आहे.

काय झाले, की तत्कालीन शाही भारतीय नौदलातील 'नर्मदा' या युद्धनौकेवर संदेश–विभागातील एक प्रमुख रेटिंग (खलाशी) म्हणून मी काम करीत होतो. सन १९४३. महिना आठवत नाही. ऑक्टोबर नोव्हेंबर वा डिसेंबर असावा. जिब्राल्टरच्या सामुद्रधुनीतून इटालीतील एका बंदराकडे निघालेल्या व्यापारी आगबोटींच्या काफिल्यास संरक्षक म्हणून असलेल्या लढाऊ बोटींपैकी 'नर्मदा' होती. कमांडिंग–ऑफिसर होते कॅप्टन लॉरेन्स.

संध्याकाळी सहाची वेळ. समुद्र शांत होता. व्यापारी बोटींचा तो काफिला खूप मोठा होता. 'नर्मदा' ही, मेंढपाळांबरोबर असलेल्या त्याच्या पोरासारखी, कळपाच्या पिछाडीला होती. रात्री पाणबुड्यांचे हल्ले अधिकच घातक, हे अनुभवाने मनावर ठसल्याने, प्रत्येक आगबोट आपापल्यापरीने पाणी जलदीने कापीत होती. पण व्हायचे ते घडलेच. एकाएकी एस्कॉर्ट–कमांडरला (संरक्षक युद्धनौकांचा सर्वाधिकारी) पाणबुडीचा सुगावा लागला. एवढेच नव्हे तर, त्या पाणबुडीनेही सुरक्षित अंतर राखून चटकन पाण्याबाहेर डोके काढून पुन्हा बुडी मारली. काफिल्याच्या अग्रदिशेला ती पाणबुडी होती. काफिल्याची रचना अशी केली होती:– त्या पन्नास-एक आगबोटींचे दहा गट पाडण्यात आलेले होते. आणि दर दोन गटांसाठी एक फ्रिगेट देण्यात आली होती. तो काफिला एकूण पाच समांतर गटात परंतु नागमोडी चालीने निघाला होता. ठराविक पद्धतीने एकदा उजवीकडे व एकदा डावीकडे नागमोडी वळणे घेणे, याला 'झिगझॅग' असे म्हणतात. झिगझॅगिंगमुळे पाणबुडीचे अकस्मात् संकट उपटल्यास, तांतडीची उपाययोजना करण्यासाठी सबंध मिनिट–दीड मिनिटाचा तरी अवधी कप्तानाला मिळतो.

## मेंढरांच्या कळपात लांडगा घुसला

आमच्या मार्गात प्रकट झालेली ती पाणबुडी–काफिल्याच्या, डावीकडील गटामधून घुसण्याचा प्रयत्न करीत होती. 'ॲक्शन–स्टेशन्स' (धोका निदर्शक व हालचालीची आज्ञा देणारी घंटा) खणाणली. आणि संपूर्ण–काफिल्यात एकाच वेळी धावपळ सुरू झाली. "डाव्या बाजूने वेगाने पुढे येऊन, डावी बगल संभाळा" असा आदेश आमच्या बोटीला मिळाला. मीच तो घेतला, आणि ब्रिजवर (नौका-नियंत्रण केंद्र) पोहोचता केला. रेडिओ-टेलिफोन्स बंद असल्याने सर्चलाईटच्या शटर्सद्वारे संदेशांची देवाणघेवाण सुरू झाली. दरम्यान लांडगा मेंढ्यांच्या कळपात घुसल्याने, त्यांची जी काही पळापळ सुरू होते, तशी गत काफिल्यातील व्यापारी बोटींची झाली. वळणे घेताना स्वतःच्या गिरकीमुळे किमान आणखी दोन आगबोटींना ठोकर न बसेल, अशी दक्षता प्रत्येक बोटीच्या कप्तानाला घ्यावी लागत होती. फ्रिगेट्स होत्या, त्या मालवाहू बोटींच्या बाहेरच्या बगलेस. आतमधे घुसलेली ती पाणबुडी आमच्या काफिल्याच्या मध्यबिंदूपासून कोणत्याही दिशेने किमान पंधराशे व कमाल तीन हजार यार्डांवर घुटमळत होती; वेध घेत होती. तिला बुडविण्यासाठी आवश्यक तितकी 'फायरिंग रेंज'

(गोळीबार–अंतर) मिळवावी, तर डेप्थ–चार्जचा तडाखा आपल्याच बोटीना बसण्याची भीति ! दोन फ्रिगेट्समध्ये पाणबुडी कोंडून बुडवावी, तरीही अधेमधे आगबोटी ! काफिल्याच्या बचावाच्या दृष्टीने तो दूर दूर फलावावा, तरीहि आफत ! कारण पाणबुडीला ते तर फार फायदेशीर ठरले असते. कितीही दूर अंतरावरून पाण्याखालन पाणतीर (टॉर्पेडो) मारणे, यात जर्मन नाविक खरोखरच कुशल होते. अंतर वाढल्याने पाणबुडीचा संपर्क तुटत असे. त्यामुळे ध्वनिलेखनाद्वारे तिचा मागोवा घेणाऱ्या सोनार–सेटच्या पडद्यावर टिंबासारखे तिचे प्रतीकात्मक दर्शन घडत नव्हते; लोहचुंबक लहरींद्वारें मागोवा घेणारे ॲसेडिक सेट्स् त्यावेळी सर्वच लढाऊ बोटींवर नव्हते. आमच्या काफिल्यातील संरक्षण बोटींवरही ॲसेडिक-सेट्स नव्हते. शेवटचा जीवघेणा प्रश्न हा की, एकच पाणबुडी आहे की आणखीही काही लपून बसलेल्या आहेत ? या साऱ्या गोष्टी लक्षात घेऊन पन्नास आगबोटींचे मार्गदर्शन व बचाव करण्याची जबाबदारी एस्कॉर्ट-कमांडरची होती. त्या मानाने भूदलातील रणगाड्यांचा रेजिमेंटल कमांडर किंवा विमानांच्या एका घोळक्याचा (फ्लाईट) कमांडिंग–ऑफिसर खरोखरच भाग्यवान!

**वही होता है, जो मंजूरे खुदा होता है !**

त्या धावपळीत एका मालबोटीने तिच्या समोरून चाललेल्या लढाऊ आगबोटीला अशी काही मस्त टक्कर दिली, की यंव रे यंव ! ती युद्धनौका गरंकन् फिरलीच की ! त्या टकरीच्या आघाताने निर्माण झालेल्या ध्वनिलहरी सर्वांच्या रडारवर आदळल्या. त्यामुळे पाणबुडीचा संपर्क पुन्हा तुटला. तो सांपडेपर्यंत तिच्या पाणतीराने एका आगबोटीचा बळी घेतला. आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे ती आगबोट 'नर्मदे'च्या उजव्या बाजूला होती. तर पाणतीर नर्मदेच्या डाव्या बाजूने डागला गेला होता. दुसऱ्या शब्दात, बळीचा बकरा आम्हीच व्हावयाचे. पण देवाला आमचे बलिदान नको होते. त्यातून आम्ही सांवरतो, न सांवरतो तोच आणखी एका आगबोटीच्या ठिकऱ्या उडाल्या. तर तिसऱ्या क्षणी तिसऱ्याही आगबोटीला भगदाड पडले. सारा पांचच मिनिटांचा खेळ ! पण पंधराशे जिवांपैकी जेमतेम दीडशे जीव वांचू शकले आणि त्या पाणबुडीला बुडविण्याचे आमचे सारे प्रयत्न अयशस्वी ठरले. सांगितले तर खोटे वाटेल, पण एकूण अर्धा तासाच्या त्या लढाईत 'नर्मदे'ला त्या पाणबुडीचा मागोवा एकदाही मिळाला नव्हता. बुडालेल्या बोटींपैकी एक तेलवाहू (टँकर) असल्याने साऱ्या सागरावर पेटते तेल पसरले होते. लाटांतील फॉस्फरसमुळे काही काळ ते तसेच जळत होते. आम्ही जेमतेम पन्नास जणाना वांचवू शकलो. दोन तासानंतर थोडीफार कुमक आमच्या मदतीला आली. पन्नास बोटींच्या त्या काफिल्यापैकी चाळीस बोटी आणि पाच फ्रिगेट्स् यथाकाळ इटालीतील त्या विशिष्ट बंदरात जाऊन पोहोचल्या. पण सायंकाळी सहा ते आठ दरम्यान जे काही घडले, त्यामुळे आम्ही जिवंत राहू किंवा नाही, याची शंका वाटत होतीच. पण त्याहीपेक्षा "होऊन जाऊ द्या दोन हात !" हीच ईर्षा. त्याच ईर्षेने सारे खलाशी भारलेले होते. वर्ण, वंश, जातपात, ज्ञान–अज्ञान; ज्येष्ठ–कनिष्ठ हे सारे मानवी भेदभाव त्या ईर्षेत विलीन झालेले होते. असे घडले ते एकतर्फी युद्ध! ●●●

# भारतीय लोकशाही

## [आज आणि उद्या]

-पां. वा. गाडगीळ



[तीस वर्षांहूनही अधिक काळ वृत्तपत्रसृष्टीत काढून व्यासंगी, सव्यसाची, मूलगामी चिंतनाने वृत्तपत्रीय लेखनालाही 'सार्वकालिक' दर्जा प्राप्त करून देणारे पत्रकार म्हणून अवघा महाराष्ट्र पां. वा. गाडगीळ यांना ओळखतो. त्यांची सारीच मते साऱ्यांनाच पटतील असे नाही. पण ती मते विचारणीय खासच असतात, असा आजवरचा अनुभव आहे. प्रस्तुत मुलाखतीतली 'कमिट्यांची' सूचनाही अशीच चिंतनीय वाटेल.]

**प्रश्न**–भारतीय लोकशाही आज काहीशा गोंधळात सांपडलेली दिसते आहे. निवडणूक-पद्धतीत ह्या बाबतची काही मीमांसा सापडू शकेल काय?

**गाडगीळ** :– भारतातील लोकशाही आज काहीशा गोंधळात पडली आहे हे खरे आहे. माझ्या मते पार्लमेंटरी पद्धती बरीच बदलावी लागेल. मी एकदम मला सुचणारे बदल सांगतो.

आज पार्लमेंटात निवडून येणाऱ्या सदस्याना महिनोगणती रोजच्या रोज काही काम नसते. ह्यामुळे पार्लमेंटरी लोकशाही निरुपयोगी व अपायकारक ठरत आहे. अमेरिकेतल्यासारखी कमिटी पद्धत पार्लमेंटरात असावी. लोकसभा, विधानसभा वगैरे सर्वाना मी सांगतो ती सूचना लागू आहे. राज्यसभा व विधान परिषद ह्या रद्द कराव्यात. लोकसभेच्या प्रत्येक सदस्याला कोणत्या ना कोणत्या कमिटीत सभासदत्व द्यावे. त्यासाठी प्रत्येक मंत्र्याच्या अध्यक्षतेखाली त्याच्या एक वा अनेक विषयांची कमिटी असावी. ह्या कमिटीला बाराही महिने कचेरी थाटून लोकसभेत मंजूर झालेल्या कायद्यांच्या बजावणीचे काम करण्याचा अधिकार असावा. लोकसभेचे सभासद, सरकारचे पगारी नौकर राहून, कमेटीवर टाइमटेबलाप्रमाणे काम करतील. कागदपत्रांचा अभ्यास करतील. भिन्न भिन्न पक्षांचे सभासद एका टेबलाभोवती बसून अभ्यास व चर्चा करून जे निर्णय सुचवतील ते मंत्रिमंडळापुढे यावेत. व मंत्रिमंडळाने त्यांचा विचार करून आपले निर्णय ठरवावेत. त्यांची बजावणी करण्याची जबाबदारी पुन्हा सदर कमिटयांवर यावी. ह्या पद्धतीचा मुख्य उपयोग पक्षापक्षातील तेढी कमी करण्यासाठी होईल. इतकेच नव्हे तर राज्यकारभारात आपण भाग घेऊ शकतो असे प्रत्येक सदस्यास वाटेल. प्रत्येक सदस्य आपल्या विषयात तज्ज्ञ होईल आणि लोकांपुढे आपल्या कामाचा जाब देऊ शकेल. आज जो गोंधळ माजलेला आहे तो लोकसभेचे व विधानसभांचे सदस्य आपापल्या विषयात अज्ञ आहेत म्हणून. त्यांना रिकामटेकडेपणाने आपली बुद्धि गंजून द्यावी लागते, लोकांच्या पुढे सरकारच्या भूमिकेचे समर्थन करता येत नाही. लोकांना काय हवे, लोकांचे हित कशात आहे हे सरकारला नेमके कळत नाही. सरकार व लोक यांच्यामध्ये लोकसभा व विधानसभा यांचे सदस्य हे जाणीवयुक्त व कार्यक्षम दुवे बनणे हा आजच्या परिस्थितीवर इलाज आहे. आजची जी निवडणूक पद्धत आहे, ती बदलण्याची जरूरी नाही.

**प्रश्न २ रा**:–आजच्या निवडणूक यंत्रणेत समाजाचे **वैचारिक नेतृत्व** करू शकेल असा वर्ग फारसा उत्साहाने भाग घेताना दिसत नाही. ह्याची काही कारणमीमांसा? लोकशाही स्थिरपद व्हायची असेल तर ही स्थिति चिंताजनक आहे असे आपणास वाटत नाही काय?

**गाडगीळ** — आजच्या निवडणूक यंत्रणेत वैचारिक नेतृत्व करू शकेल असा वर्ग फारसा उत्साहाने भाग घेताना दिसत नाही हे खरे असो, नसो पहिल्या प्रश्नाच्या उत्तरात मी जी रचना सुचविली आहे तीमुळे आजकाल निवडणुकीत भाग घेणारे लोकही. वैचारिक नेतृत्त्व करण्यास समर्थ होतील. कालांतराने आपण ज्याना "**वैचारिक नेतृत्व करणारे**" असे मानतो त्यानाही राजकारणात रस वाटू लागेल.

**प्रश्न ३ रा** — निवडणुका झाल्यावर उमेदवार व मतदार ह्यांच्यामध्ये पाच वर्षेपर्यंत एक मोठी दरी उभी राहते असे दिसते. ह्या दोघा घटकात काही संबंध रहावेत, समस्यांबाबत विचारविनिमय व्हावा ह्याबाबत आपण काही मार्ग सुचवाल काय?

**गाडगीळ** — मी पहिल्या प्रश्नाच्या उत्तरात सुचविलेली योजना स्वीकारल्यास उमेदवार व मतदार यांच्यात आजच्यासारखी दरी उभी राहणार नाही. लोकसभेतील निरनिराळ्या कमिट्यांचे सदस्य आपल्या मतदार संघातील लोकांना वरचेवर भेटून त्यांच्याशी संपर्क साधतीलच.

**प्रश्न ४ था** – निवडणुकीत अपप्रचार, हिंसा, गुंडगिरीचे प्रकार टाळून त्या अन्य लोकशाहीवादी राष्ट्रांप्रमाणे खुल्या वातावरणात होतील यासाठी भारतात काय करता येईल?

**गाडगीळ** — निवडणुकीत असे प्रकार वगैरे जे हल्ली होतात, ते भारतात

अतिरेकास पोहचल आहेत असे मला वाटत नाही. पण सरकार पक्ष व विरोधी पक्ष अशा दोघांनाही कमिटचात काम करण्याची संधि मिळून आपण राज्य-कारभार चालविणारे आहोत असे सर्व पक्षांच्या पुढाऱ्याना वाटू लागेल तर हिंसा, गुंडगिरी ह्याना आपोआपच आळा बसेल.

**प्रश्न ५ वा**–लोकशाहीत महत्वाच्या प्रश्नांबाबत विरोधी पक्षांना विश्वासात घेण्याची स्वर्गीय लालबहादूर शास्त्रीजींनी स्वीकारलेली पद्धत जर शासनाने स्वीकारली तर लोकसभेतले अनुचित प्रकार टाळण्यास मदत होईल असे आपणास वाटते काय ?

**गाडगीळ**– विरोधी पक्षांना महत्वाच्या प्रश्नांबाबत विश्वासात घेण्याची शास्त्री यांची सूचना मोघम होती. मी सुचवितो अशी कमिटी पद्धत सर्व खात्यांबाबत लोक-सभेत व सर्व विधानसभांत करणे हाच विरोधी पक्षांना विश्वासात घेण्याचा उपाय आहे. याहून कमी दर्जाचा कोणताही पर्याय विरोधकांचे समाधान करू शकणार नाही.

**प्रश्न ६ वा**–आपला प्रतिनिधी जर पार्ले-मेंटरी लोकशाही पद्धत धाब्यावर बसवून प्रतिनिधि-सभेत जर सतत अनुचित वर्तन करीत असेल, काही राष्ट्रविघातक वा राष्ट्र-प्रतिष्ठेस बाधक असे वर्तन करीत असेल तर त्याला परत बोलावण्याचे स्वातंत्र्य घटनेत समाविष्ट केले तर ?

**गाडगीळ**–प्रतिनिधीला परत बोलाव-ण्याची कल्पना अगदी चुकीची आहे. हा प्रश्न लोकशाही राज्य घटनेच्या मुळातला प्रश्न आहे. इंग्रजीत **'रिप्रेझेंटेटिव्ह'** व **'डेलिगेट'** असे दोन शब्द प्रतिनिधी या एकाच शब्दाला वापरले जातात! 'डेलि-गेट' हा सांगकाम्या असतो. त्याला फक्त **'दूत'** म्हणता येईल, किंवा 'वकील' म्हणता यईल. त्याने सांगितलेले काम सांगितलेल्या पद्धतीने करायचे असते. पण पार्लमेंटात निवडून येणारा प्रतिनिधि हा **'रिप्रेझेंटेटिव्ह'** असतो. लोकांनी त्याच्या बुद्धिमत्तेवर, त्याच्या मतदार-निष्ठेवर विश्वास ठेवून त्याला निवडलेले असते. तो 'सांगकाम्या' नव्हे. त्याच्या बुद्धीप्रमाणेच तो काम करेल. उठल्या-सुटल्या त्याला परत बोलावले जाण्याचा धोका दिसेल तर कोणीहि स्वाभिमानी मनुष्य निवडणुकीस उभा राहणार नाही.

**प्रश्न ७ वा** – सामान्य माणसाला आज ह्या 'लोकशाही'च्या प्रयोगात रस अस-ल्याचे दिसत नाही. त्याची काही कारण-मीमांसा ?

**गाडगीळ**–मी वर सुचविलेल्या योजने-नुसार आजच्या लोकशाही रचनेत बदल होईल तर सामान्य माणसालाही लोक-शाहीत रस वाटू लागेल.

**प्रश्न ८ वा** –संयुक्त आघाड्यांचे राज-कारण ह्या देशाला कधी काळी स्थिर सरकार देऊ शकेल काय?

**गाडगीळ** – संयुक्त आघाड्यांचे राज-कारण आजच्या स्थितीत निरुपयोगी आहे. त्याने अराजकच माजेल. पण आजच्या लोकशाहीतूनही मी सुचवितो ती रचना लवकर स्वीकारली न गेल्यास मला नजिकच्या काळातही अराजकाचा धोका दिसतो आहे.

**प्रश्न ९ वा** – एकपक्षीय हुकूम-शाहीच्या सीमारेषेवर आज आपण उभे आहोत असे आपणास वाटते काय?

**गाडगीळ**–मला एकपक्षीय हुकूमशाहीची भीति वाटत नाही. भीति आहे ती अरा-जकाची किंवा उघड अथवा प्रच्छन्न लष्करी हुकूमशाहीची ! एकपक्षीय हुकूमशाही गाजविण्यासाठी जबरदस्त शिस्तीने बांध-लेला असा कार्यक्षम पक्ष ह्या देशात नाहीच. मी वर सुचविली ती योजना स्वीकारली गेल्यास मात्र सर्व पक्ष हळु-हळू जवळ येतील. मी सुचविलेल्या रच-नेत आणखी थोडीशी भरही मला घाला-वयाची आहे. बहुमतवाल्या पक्षाकडून हल्ली जे मंत्रिमंडळ बनविले जाते ते बहुमतवाल्या पक्षाचा पुढारी निवडला गेल्यावर तो पुढारीच नेमतो. माझी सूचना अशी की बहुमतवाला पक्ष ज्या-प्रमाणे आपला पुढारी म्हणजे प्रधानमंत्रि निवडतो त्याप्रमाणे त्या पक्षानेच प्रत्येक खातेवार मंत्रि निवडावा. ह्यामुळे पक्षां-तर्गत लोकशाही अधिक जागृत होऊन पक्षातील सदस्यांच्या महत्वाकांक्षेला अधिक वाव मिळेल. व्यक्तिप्रभावापेक्षा पक्ष प्रभावाचे महत्व वाढेल. विरोधी पक्षांनाही बहुमतवाल्या पक्षात सामील झाल्यास आपला प्रभाव पडेल अशी आशा वाटू लागेल. हल्लीच्या नियंत्रित अर्थसंघटनेच्या काळात **'सोशॅलिझम'** **'कॅपिटॅलिझम'** वगैरे शब्दांना काही अर्थ राहिलेला नाही. लोककल्याण, नियोजन ह्या गोष्टी कमी अधिक प्रमाणात सर्वसंमत झाल्या आहेत. मतभेद तात्विक नसून व्यावहारिक झाले आहेत. कमि-टचांच्या टेबलावर सर्वपक्षीय सदस्यांनी आपापली बाजू मांडून कागदपत्रांचा व वस्तुस्थितीचा पुरावा मांडून निर्णय ठर-विण्याची पद्धत पडली म्हणजे आजच्या भिन्न भिन्न पक्षांचे महत्व राहणार नाही. त्यातून पक्षहीन लोकशाही निर्माण होईल की काय हे मी आज सांगू शकत नाही, पण खुल्या विधानसभेत अथवा खुल्या लोकसभेत मुख्य वा प्रधानमंत्रि आणि बाकीचा प्रत्येक खातेदार मंत्रि निवडला जाणे हे शेवटी अपरिहार्य, व्यवहार्य व इष्ट ठरेल असे मला वाटते. कमि-टचांची कामे व त्यातील सदस्यांची कामे बाराही महिने चालावयाची म्हटली म्हणजे त्यांना पगार, भत्ते देण्यात खर्च वाढेल. पण हल्लीची लोकसभा फक्त शंभर दीडशे सदस्यांची कां नसावी हे मला कळत नाही. त्यामुळे मतदारसंघ फार मोठे होतील हे खरे. विधानसभांची संख्याहि अशीच कमी करावी. त्यांचेही मतदार-संघ मोठे होतील. पण निवडणुकी ह्या जिल्हा परिषदा-विधानसभा व लोकसभा ह्या सर्वांच्या एकदम केल्या म्हणजे जिल्हापरिषदातले पक्ष आपापल्या पक्षांच्या निवडणुका लढविण्यास मदत करतील व मतदारसंघ मोठे असले तरी निवडणुका लढणे जड जाण्याचे कारण नाही. विधानसभा व लोकसभा ह्यातील निम्म्या सदस्यांची निवडणूक पाच वर्षांनी व्हावी म्हणजे प्रत्येक सदस्य एकदा








निवडून आल्यावर दहा वर्षे कायदे मंडळात राहील व तेथे कमिटयांमध्ये राहून दैनंदिन काम केल्याने आपल्या अनेक खात्यांच्या विषयात तरबेज होईल. आणि अशा रीतीने अभ्यास करून व राज्यकारभार करून शहाणी व व्यवहारक्षम झालेली माणसे सरकारला उद्योगधंद्यांच्या राष्ट्रीयीकरणात व्यवस्था-खात्यासाठी उपलब्ध होऊ शकतील. आज सरकारी कॉर्पोरेशन्स अपेशी ठरत आहेत त्याचे कारण अनुभवी कारभारतज्ञ त्यांना मिळत नाहीत हे आहे. माझ्या सूचनेप्रमाणे रचना बदलल्यास अनुभवी कारभारतज्ञ विधानसभा व लोकसभा यातून दहा वर्षात तयार होतील. दर पाच वर्षांनी अर्धे सभासद निवडायचे असल्याने अनुभवी सदस्यांची अर्धी संख्या विधानसभात व लोकसभात कायमची राहील. भारतात आज पार्लमेंटरी लोकशाही मोठ्या जिकिरीच्या अवस्थेत आली आहे हे खरे आहे. तीस अराजकाचा धोका निश्चित आहे. पण मी सुचवितो तो उपाय शक्य तितक्या लवकर अंमलात आणल्यास आजची लोकशाही अधिक कार्यक्षम व लोकशाही गुणांनी युक्त अशी होईल, अराजकाचा धोका उत्पन्न होण्याचे आजच्या परिस्थितीत असलेले दुसरे कारण-तरुणांना संस्कृति नाही. माझ्या मते बेडेन पॉवेल यांनी केलेली बॉय-स्काऊट चळवळ कोणत्या ना कोणत्या स्वरुपात भारतात सुरू करणे आवश्यक आहे. बॉय-स्काऊट चळवळ हा शब्द वापरून मला जे जे हवे ते ते सर्व ह्यात सांगितले आहे. ती चळवळ उदात्ततेची, अहिंसेची, लोकसेवेची, लोकजागृतीची व सर्वदृष्टीनी विधायक अशी चळवळ आहे. जागेच्या अभावी मी येथे तपशीलात शिरत नाही. पार्लमेंटरी पद्धतीत मी वर सुचवलेली सुधारणा अधिक बॉय-स्काऊटची चळवळ हे दोन उपाय आजच्या भारतातील सर्व दुःस्थितीवर रामबाण उपाय आहेत असे मला वाटते. त्यातून यत्नशील, शांततावादी, विधायक व शास्त्रीय दृष्टीची लोकशाही निर्माण होईल. हे सर्व झाले तरी लोकसंख्येची वाढही अफाट होत चालली आहे. ती ताबडतोब न थांबल्यास आणखी दहा वर्षांनी सर्वांचे सर्व शहाणपण व्यर्थ जाऊन सर्व प्रकारचा अनर्थ माजण्याचा धोका आहे. दर एकरी पीक वाढविणे हा त्यावर उपाय आहेसे वाटते. पण त्यालाही मर्यादा आहेत. आणि माणसांना राहण्यालाही जागा अपुरी पडली तर ते दर एकरी पीक वाढविण्याचाही काही उपयोग नाही. बांदेकरांनी म्हटल्याप्रमाणे स्मशानातही एक प्रेत दुसऱ्या प्रेताला "जरा सरकन घ्या" असे म्हणेल की काय इतकी भीति मला ह्या प्रश्नाची वाटते. पण मला त्यासंबंधाने काही उपाय सुचत नाही.

●●●









# दिवाळी अंकातील
# कादंबऱ्या

-प्रा. रमेश तेंडुलकर




**सालाबादप्रमाणे** यंदाहि दिवाळी आली आणि दीड-दोनशे दिवाळी अंक मागे ठेवून गेली. कीर्तिरूपे उरणारे ह्यातले साहित्य किती ते यथावकाशच ठरायचे असते. दरवर्षीच घडणारी ही घटना आहे. अर्थात् ह्यात गैर किंवा तक्रार करण्यासारखे काही नाही. सृष्टीच्या व्यापारातही गूढ, अज्ञात, अनाकलनीय आणि अतर्क्य भागाबरोबर ऋतुचक्रातून नियमितपणे तेच ते डोळ्यांसमोर येणारेहि सृष्टीचे एक रुप असते. मात्र त्यातूनही गतीचे सातत्य जाणवत राहाते. दर वर्षी दिवाळी अंक प्रसिद्ध होतात. ते सारख्याच दर्जाचे असतील असे नाही. परंतु साहित्य क्षेत्रातील गतीचे सातत्य त्यातून जाणवत राहते, हे खरे महत्वाचे. कधी विशिष्ट शाखाना विशेष बहर आला तेव्हाचे दिवाळी अंक टवटवीत, अजूनहि स्मरणात राहणारे ठरले. नेहमीच असे घडेल असे नाही. त्याची अपेक्षाहि नसावी.

यंदादेखील दिवाळी अंकातून प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्यांची संख्या पन्नासहून अधिक आहे. म्हणजे संख्येच्या दृष्टीने निर्मितीत तशी घट नाही. तरीपण चिरकाल स्मरणात राहील, एक मोठा संस्कार मनावर करील, असाधारण कलात्मक उंचीने पृथगात्म ठरेल, अशी ह्या वर्षीची दिवाळी अंकातील कादंबरी कोणती असा प्रश्न विचारला तर त्याचे उत्तर चटकन् देता येणे कठीण आहे. ह्याचा अर्थ कादंबरीच्या क्षेत्रातील सगळे वातावरण उजाड, उदास, निश्चेष्ट, अवकळा आल्यासारखे चेतनाहीन झाले आहे, असा मात्र नाही. परंतु प्रथितयश आहेत ते कोठे तरी थांबले आहेत किंवा स्वत:च्या आवर्तात अडकले आहेत. अगदी नव्यांचे प्रयत्न प्रामाणिक असूनहि अजून बरेच कमी पडत आहेत, काहींना त्यांच्या अंगभूत मर्यादानीच जखडून ठेवले आहे तर कांहीजण विलक्षण आत्मसंतुष्टतेने निर्मितीचा उच्चांक गाठण्यात धन्यता मानीत आहेत. ह्याच्या जोडीला गेल्या कांही वर्षात ज्यांनी मोठ्या उमेदीने लेखन केले आहे, ज्यांना प्रसिद्धी मिळाली आहे, किंवा ज्यांच्याकडून अपेक्षा निर्माण झाल्या आहेत, अशी बरीच नावे ह्या वर्षी एकदम गुप्त झाल्यासारखी वाटतात. त्यांची अनुपस्थिति तीव्रतेने जाणवल्याखेरीज राहात नाही.

तसं पाहिलं तर ही अनुपस्थिति जुन्या पिढीतील प्रा. ना. सी. फडक्यांच्या नावापासून जाणवते. 'अंजली'च्या दिवाळी अंकातून संपूर्ण नवी कादंबरी देण्याचा कित्येक वर्षांचा प्रा. फडक्यांचा प्रघात यंदा त्याना राखता आलेला नाही, व त्याबद्दल त्यानी वाचकांची क्षमा मागितली आहे. 'सह्याद्री'मध्ये त्यांच्या नव्या कादंबरीला सुरुवात झाली असली तरी त्या अंकात ती संपूर्ण प्रसिद्ध झालेली नाही. पु. भा. भावे ह्यांची, 'मागे वळून', ही 'लोकसत्ते'त प्रसिद्ध झालेली कादंबरी यंदा प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्यात एका बाबतीत वेगळी उठून दिसणारी आहे. ती बाब म्हणजे ह्या कादंबरीत दोन पिढ्यांचे तौलनिक चित्रण येते, त्यामुळे कादंबरीला मोठा आवाका निर्माण होण्याची शक्यता होती. अनेक वर्षांनंतर आपल्या गावी परत आलेल्या ह्या कादंबरीतील नायकाला सगळ्या गावाचे रंगरूप, त्याचे आंतरजीवन आमूलाग्र बदललेले, अनोळखी झालेले, भ्रष्ट झालेले दिसून येते. गरगरायला लागेपर्यन्त नायक गावातून फिरतो. वस्तुत: ह्या अनुभवातून एक फार मोठी कलाकृती निर्माण होण्याची शक्यता होती व भाव्यांच्या प्रतिभेचे सामर्थ्य अशा तऱ्हेचा अनुभव पेलायला कमी पडणारे नाही. परंतु भाव्यांचे नव्या पिढीविषयीचे पूर्वग्रह, पक्के झालेले समजच येथे प्रभावी ठरतात, त्यांच्यातील कलावंतावर कुरघोडी करतात व मग कोठे कोठे हुरहूर लावणारे, अस्वस्थ करून सोडणारे प्रसंग वगळले तर ही सगळी कादंबरी म्हणजे भाव्यानी आजच्या पिढीविषयीच्या त्यांच्या समजुतीचे आग्रहाने केलेले प्रतिपादन, एवढाच कलाहीन परिणाम शिल्लक राहातो. त्यात भाष्ये आहेत, प्रवचने आहेत, निबंध किंवा वृत्तपत्रीय लिखाणात शोभतील असे उतारे आहेत, प्रकट स्वगते आहेत, आणि वेदनेने ठिवकणारे अंत:करणहि आहे. एक नाही ती फक्त कलादृष्टी. भाव्यांच्या प्रतिभेविषयी आदर असणाऱ्याना, त्यांच्यामधील कलावंताची ही शोककथा पाहून व्यथित व्हायला होते. इतर कादंबऱ्या व्यक्तीचे जीवन, कौटुंबिक जीवन, किंवा एकाद्या वर्गाचे समाजजीवन ह्यावर आधारलेल्या आहेत. वसुंधरा पटवर्धन ह्यांची 'नेत्रा' वि. वि. बोकील ह्यांची 'पळसाला पाने तीन,' श्री. ज. जोशी ह्यांची 'संगत', शं. ना. नवरे ह्यांची 'सुरुंग' ह्या कादंबऱ्या यशस्वी असल्या तरी त्यांच्या निर्मात्यांच्या आजवरच्या प्रतिष्ठेत नवीन वेगळी भर घालणाऱ्या नाहीत. रुढीच्या चाकोरीत सापडलेल्या हळव्या तरुणापायी, त्याच्यावर एकनिष्ठ प्रेम करणाऱ्या नायकिणीच्या हळुवार मनाच्या मुलीची झालेली दारुण शोकांतिका, आणि त्याची त्या तरुणाच्या हृदयाला छळणारी हळहळ हा वसुंधराबाईंच्या कादंबरीचा विषय आहे. एका सरळ रेषेत ह्या कादंबरीतील अनुभवाचे चित्रण होते. तरुणीविषयी पुरुषांना वाटणारी अभिलाषा बोकिलांनी चढत्या भाजणीतील गणिताच्या पद्धतीने मांडून दाखविली आहे. श्री. ज. जोश्यांच्या कादंबरीतील






अनुभव वेगळ्या पातळीवरचा असला तरी उत्तरार्धात विद्याधर आणि वसुधा ह्यांच्या नात्यात जो एक हिडीसपणा निर्माण होतो, त्याला पुरेशी बळकट मानसिक पार्श्वभूमि त्यांनी आधी निर्माण केलेली नाही. विद्याधर पॅरोलवर सुटून येईपर्यंतचा भाग सरळ रेषेत घटनाप्रधान कादंबरीसारखा आला आहे व पुढे कादंबरी अंतर्मनाच्या संघर्षाला प्राधान्य देते. तिची तीव्रता वेगळ्या प्रकारे वाढते व आधीच्या भागापासून ती तुटून पडते. स्वतः प्रेम करायच्या वयातील एक तरुण आपल्या आईचे स्वैराचारी जीवन पाहून घर सोडून जातो व ह्या जगाच्या बाजारात वेगळे वेगळे अनुभव घेत, वेगवेगळी ऋणे फेडीत भटकतो ह्याचे चित्रण शं. ना. नवऱ्यांच्या कादंबरीत आले आहे. नायकाच्या मनोरचनेला पुरेसा बळकट आधार न दिल्यामुळे व सगळेच चित्रण हलक्या फुलक्या पद्धतीने केल्यामुळे अनेक प्रसंगांची आणि व्यक्तींची गर्दी होऊनहि ही कादंबरी परिणामाच्या दृष्टीने विस्कळीत वाटते. व्यसनी पिता आणि त्यामुळे दुःखी झालेली मुले, ह्या कचाट्यात पत्नी आणि माता ह्या भूमिका पार पाडताना त्या कुटुंबातील स्त्रीच्या जीवनाची होणारी परवड हा अनिरुद्ध पुनर्वसु ह्यांच्या 'हृदयी अमृत नयनी पाणी' ह्या कादंबरीतील अनुभव वेगळा असूनहि अखेर एका सांकेतिक चित्रणात परिवर्तित होतो. नेहमीप्रमाणे चंद्रकांत काकोडकरांच्या कादंबऱ्या संख्येने अधिक आहेत. माझ्या वाचनात त्यांच्या सहा तरी कादंबऱ्या आल्या. पानशेतच्या फुटलेल्या धरणापासून तो थेट पाकिस्तानी हेरगिरीपर्यंत एकादी नावीन्यपूर्ण पार्श्वभूमि कथेला कल्पून त्यातून एक चटकदार, रंजकशैलीतील प्रणयकथा निर्माण करायची ह्यात त्यांचा हातखंडा आहे. वैचित्र्याचा हव्यास असलेली त्यांची चतुराई मात्र वाखाणण्यासारखी आहे. मराठीतील एका प्रथीतयश कवीचे नांव तरुणीना फसविणाऱ्या एका काझीछाप व्यक्तीला देण्यात त्याना अशीच 'चतुराई' दाखवायची आहे की काय कोण जाणे! विज्ञानाने लावलेले शोध आणि त्यांनी निर्माण केलेली परिस्थिति, ह्यावर आधारलेल्या एच. जी. वेल्स ह्यांच्या कादंबऱ्या विलक्षण गाजलेल्या आहेत, तसा प्रयत्न श्री. नारायण धारप ह्यानी केला आहे. 'आरिष्ट अंगारक' व 'पारंब्याचे जग' ह्या त्यांच्या दोन कादंबऱ्या, ह्या प्रकारच्या आहेत. परंतु कांही पारिभाषिक संज्ञांच्या उपयोगापलिकडे ह्या रचनेत विज्ञानाधिष्ठित अद्भुत रम्य सृष्टि निर्माण करण्याचे मुळीच सामर्थ्य नाही. एक नवे दालन शोधूनहि त्यांचे प्रयत्न फारच थिटे आणि कलाहीन ठरले आहेत. अर्नाळकर, काशीकर, सिनकर, सूर्यवंशी इत्यादि रहस्यकथा कादंबऱ्या लिहिणाऱ्याचे लेखन, मागील पानावरून पुढे चालू, अशा पद्धतीने सातत्याने ह्यावर्षी चाललेले आहे. वि. आ. बुवा ह्यांच्या 'इकडे गंगू–तिकडे अंबू' ह्या कादंबरीतील मूळ विनोदी घटना लहानशीच असल्यामुळे तिची पिंजण परिणामहीन वाटते.

ह्या सर्व लेखकांकडून नव्या, फारशी परिचित नसलेल्या, किंवा पहिला–वहिला प्रयत्न करणाऱ्या लेखकांच्या



कृतींकडे नजर टाकल्यास, पुण्याच्या 'तरुणभारत' मध्ये प्रसिद्ध झालेली सौ. ज्योत्स्ना देवधर ह्यांची 'धरगंगेच्या कांठी,' वसुधा मासिकातील संभाजी बांदिवडेकर ह्यांची, 'तिसरा डोळा,' आणि 'बेळगांव समाचार' मधील अ. ह. मिसाळ ह्यांची 'अक्षरा', ह्या तीन कादंबऱ्यांचा वेगळा उल्लेख केला पाहिजे. ज्योत्स्ना देवधर

( पृष्ठ ६६ वर पहा )












मुख्य मंत्री
सचिवालय, मुंबई ३२
१४-१-१९६७

येत्या प्रजासत्ताक दिनानिमित्त दीपावली मासिकाचा 'नौदल दर्शन' विशेषांक काढण्यात येणार असल्याचे वाचून आनंद वाटला.

बाहेरील शत्रूपासून देशाचे संरक्षण करण्यासाठी संरक्षण यंत्रणा कार्यक्षम असणे अत्यंत आवश्यक असते. हवाई दल, पायदल व नाविक दल ही संरक्षणाची तीन अंगे होत. यांच्या विकासावर व कार्यक्षमतेवर देशाचे संरक्षण अवलंबून असते. पाकिस्तानशी गल्या वर्षी झालेल्या संघर्षात आपल्याला त्याचा प्रत्यय आला. आपल्या सैनिकांनी व हवाई दलातील तरुणांनी असामान्य कर्तृत्व गाजवून, देशाच्या स्वाभिमानाचे व स्वातंत्र्याचे रक्षण केले. आपल्या देशाला फार मोठा समुद्र किनारा लाभलेला असून, त्याचे संरक्षण करण्यासाठी चांगले कार्यक्षम नौदल असणे आवश्यक आहे. नौदलाची परंपरा महाराष्ट्रात फार जुनी आहे. छत्रपति शिवाजी महाराजांच्या काळीही कोंकणच्या किनाऱ्यावर मोठे आरमार होते. तेव्हा, ही परंपरा केवळ चालविली पाहिजे एवढेच नव्हे, तर आधुनिक काळानुसार नौदलाचा विकास घडवून आणला पाहिजे.

या अभिनव उपक्रमास मी सुयश चिंतितो!

—वसंतराव नाईक





## कोटी कोटी प्रणाम !

**भारताच्या** प्रजासत्ताकाला आजचे रंगरूप देणाऱ्या सर्व ज्ञात, अज्ञात हुतात्म्यांना अभिवादन! नवी स्वप्ने आणि नवे संकल्प देऊन जाणाऱ्या, नव्या आशा आणि नवे उन्मेष फुलविणाऱ्या ह्या प्रजासत्ताक भारताला आमचे कोटी कोटी प्रणाम!

**दुरितांचे तिमिर जावो। विश्व स्वधर्म सूर्ये पाहो ॥**
**जो जे वांछील तो ते लाहो। प्राणिजात ॥**

## प्रजासत्ताकाला नवे आव्हान

**प्रजासत्ताक** भारताला अभिवादन करीत असताना पाच महिन्याच्या अखेरीस होणाऱ्या चवथ्या सार्वत्रिक निवडणुकीचे ढोल-डिंडिम कानी येत आहेत. रस्त्याने जाताना, गाडीत, कार्यालयात, हॉटेलात सर्वदूर **'यानाच मते द्या'** असे मूक आदेश प्रत्येकाला मिळत असतात. वृत्तपत्रे हाती घेतली तरी हेच दिसते. साऱ्यांच्या प्रतिज्ञा इये देशी 'नंदनवन' आणण्याची! ज्यांना वारंवार संधि दिली गेली आणि तरीहि ज्यांना 'नंदनवना'चे स्वप्न प्रत्यक्षात आणता आले नाही ती ही माणसे 'परत एकदा संधि द्या; ह्यावेळी नक्की' असे कंठरवाने सांगत होती—तर ज्यांनी प्रत्यक्षात खूप प्रयत्न करूनही ज्यांना भारतीय जनमानसाने कौल दिला नाही ती माणसेही नंदनवनाचेच स्वप्न घेऊन पुढे धावत आहेत! 'एकदा संधि द्या. किमया करून दाखवितो' असे म्हणताहेत. 'मते द्या' ही विनंति आहे की आदेश आहे ह्या गोंधळात आजचा मतदार परत सापडलेला दिसतो आहे. गेल्या सार्वत्रिक निवडणुकीनंतरच्या काळात बरेचसे काही घडून गेले आहे. फार मोठ्या, सत्व पाहणाऱ्या घटना घडल्या. चीनच्या मैत्रीची स्वप्ने पहात बसलेल्या ह्या देशावर नेफामधून चीनने स्वारी केली. पंडितजींची स्वप्ने विरली. त्यांच्या मनाला फार मोठा धक्का बसला. केनेडींची हत्या झाली. ह्या दोन मोठ्या आघातांनी पंडितजी खचले. त्यांचा त्यातच अंत झाला. त्यानंतर कॉंग्रेसच्या सत्ता संघर्षात बऱ्याचशा मंथनानंतर लालबहादुरांचे अमृत बाहेर पडले. कसोटीचे क्षण वाढले पण त्यात रत्नही पारखले गेले. कच्छ-काश्मीरच्या लढयात सुवर्ण उजळून निघाले. ज्याला शांति हवी असेल त्याला शस्त्रेही समर्थपणे पेलता आली पाहिजेत आणि ज्याचे शस्त्रावर सामर्थ्य आहे त्यालाच शांतीची भाषाही करता येते हे शास्त्रीजींनी दाखविले व ताश्कंदच्या रणभूमीत देह ठेवला. इंदिराजींचा काळ कठिण होत गेला आहे. युद्धात शांतता झाली. पण देशात नाही. भाषावाद, प्रांतवाद, जातिवाद, गोहत्याबंदी, जन कॉंग्रेस, फत्तेसिंगांचे उपोषण, विद्यार्थि-दंगली, मोर्चे, हरताळ, संप सारे काही वाढले आहे. जनकॉंग्रेसने ठिकठिकाणी आव्हान दिले आहे. सरकारी नोकरांच्या संपाने इंदिराजींच्या प्रांतातच राज्य-यंत्र खिळखिळे करून टाकले आहे. फत्तेसिंगांच्या उपोषणाने हवालदिल झालेले राज्यकर्ते शंकराचार्यांच्या उपोषणाकडे ज्या थंडपणे व मख्खपणे पहात बसले आहेत आणि देशविघटनकारी शक्तींसाठी सुद्धा जिथे लोटांगण वाद (नागा-आसाम वगैरे) चालू आहे तिथे तत्व म्हणून घटनेने स्वीकारलेल्या 'गोहत्ये'च्या प्रश्नाबाबत

अनुक्रमणिका





मात्र 'घटनालाबदला' चा जो बाऊ करण्यात येत आहे हे पाहून जनता संभ्रमात पडली आहे. चर्चा चालू असतानाच गाड्या उडविणाऱ्या व आमच्या संरक्षकांना यमलोक दाखविणाऱ्या नाग नेत्यांशी शांति-चर्चा करणाऱ्या पंतप्रधानांनी ५६ दिवसांहून अधिक दिवस उपोषण करणाऱ्या शंकराचार्यांसारख्या धर्मगुरूला भेटण्याइतके साधे सौजन्यही दाखवू नये, उलट "ब्रिटीशांचे राज्य इथे दोनशे वर्षे होते तेव्हा यांनी कुठे 'गोहत्ये'ची मागणी केली नाही ते" असा सवाल टाकावा हे काहीसे उद्वेग-जनक आहे. ब्रिटीशांच्या विरुद्धचा लढा प्रामुख्याने 'स्वराज्या'चा होता. स्वराज्या-तले सारे लढे आता 'सुराज्या'साठी आहेत हे इंदिराजींनी ध्यानी घ्यायला हवे असे वाटते.

अशा वातावरणात आजचा भारत चवथ्या सार्वत्रिक निवडणुकीसाठी सज्ज झाला आहे. भोवताली इंडोनेशियात डॉ. सुकर्ण यांची 'चिनी क्रांति' कोलमडली व ते स्वतःच आता 'गुन्हेगारी' खटल्यात उभे आहेत. खुद्द चीनमध्ये सत्तास्पर्धा सुरू झाली आहे. 'सांस्कृतिक क्रांति' हे गोंडस नाव तिने धारण केले आहे. ह्या स्पर्धेकडे साऱ्या जगाचे डोळे लागले आहेत. भारतातल्या निवडणुकीकडेही असेच साऱ्या जगाचे डोळे लागले आहेत. काँग्रे-सला तडे गेले आहेत. विरोधकांनी आव्हाने दिली आहेत. राज्य कर्त्यांविष-यीची श्रद्धा कोलमडली आहे. अन्नासारखे प्रश्न हे कृत्रिमरीत्या उत्पन्न केले गेले आहेत अशी धारणा (अनुभवाने) लोक-मानसात रुजली आहे.पंजाबी सुभा, गोहत्या बंदीसारख्या प्रश्नांतून 'ताण' वाढतो आहे—पण हे सारे असूनही एक गोष्ट आशादायक आहे ती ही की, येथे लोक-शाही रुजली आहे. पचली आहे. आज ना उद्या येथे शुद्ध शासन देणारी यंत्रणा आणण्याचे सामर्थ्य त्या 'फुली'तच आहे हा विश्वास वाढला आहे. त्या'फुली'तून येथे क्रांति आणू असे विरोधी पक्षही मानीत आहेत. अत्याचारी मार्ग अनुसरले जात असले तरी त्यांचे मर्यादित सामर्थ्य आता साऱ्यांना जाणवले आहे. आणि म्हणूनच साऱ्या शक्ति एकवटून सर्व पक्ष आता निवडणूक जिंकण्यासाठी बद्धपरिकर झाले आहेत. पंडितजींच्या निधनानंतर होणारी ही पहिली 'अधिकृत' निवडणूक आहे. ह्या देशाचे उद्याचे शिल्पकार व उद्याचे नेतृत्व निवडणारी ही निवडणूक आहे. देश यादवी, अराजक व आत्यंतिक असंतोषाच्या सीमेवर उभा आहे. इथे क्रिकेटच्या मैदानावरही आता तो असंतोष क्रियाशील होऊ शकतो. अशा ह्या स्फोटक वातावरणात लोकशाही श्रद्धा हातात 'फुली' घेऊन एक नवे आव्हान ह्या प्रजासत्ताक भारताला देत आहे. त्या आव्हानाचा निर्णय डोळस-पणे, समंजसपणे आणि 'उद्या' वर अचूक दृष्टि ठेवून आपण साऱ्यांनी घ्यायचा आहे. People get the Government they deserve असं म्हटलं जातं. उद्याचे शासनकर्ते आपण घडविणारा आहोत. आपल्या 'फुली'ची छिन्नी योग्य व कलात्मक रीतीने वापरली तर 'मंगल मूर्ति' तयार होईल, नाही तर. . . . .

ह्या प्रश्नाचे उत्तर अखेर आपण देणार आहोत. कारण आपणच तर ह्या भारतीय लोकशाहीचे खरे पाईक आहोत. खरे रक्षक आहोत. खरे शिल्पकार' आहोत! !

## मेनन 'लाल' झाले (होतेच ते)

कृष्ण मेनन 'लाल' झाले. रागाने 'लाल' झाले. रंगाने 'लाल' झाले. करंजि-यांचे 'लाल' होते ते आता त्यांच्याच धीराने अधिकृत 'लाल' झाले. सिने-नटांचे "लाल" मेनन त्यांच्याच इच्छेने एकदा पुन्हा 'लाल' झाले. त्यांचा तो पांढरा पोषाख (टोपी सोडून) कसासाच दिसत होता. त्यांना तो शोभत नव्हता. त्यांच्या 'लाल' प्रकृतीशी तर तो फारच विसंगत

वाटत होता. त्यांच्या सग्यासोयऱ्यांना तर नेहमीच तो तसा वाटत आलेला होता. मेननजीनांही तो आवडत नव्हता. पण नेहरुचाचांना तसे आवडणार नाही म्हणून मेननजींनी कुरकुर (निदान प्रगटपणे तरी) केली नाही. पण चिन्यांनी ऐनवेळी समाजवादी श्रद्धेवर नेफातून वार केला आणि मेनन यांची सारी आश्वासने कोलमडली. "समाजवादी राष्ट्रे कधी आक्रमण करीत नाहीत" असा बकवा करणाऱ्या लाल डांगे–नंबुद्रीपादांना अजूनही 'आक्रमण झाले नाही' असे वाटत असले तरी लोकमत त्यांच्या बाजूचे नव्हते व नाही. त्यामुळे श्री. कृष्ण मेनन यांचे प्यादे नेहरुजींच्या हयातीतच येथल्या राज्यपटावरून बाहेर फेकले गेले. कृष्ण मेनन यांची त्यानंतरची कारकीर्द पंख गळून पडलेल्या पाखरासारखीच! पण माणसाचा अहंकार हा त्याच्यापेक्षा मोठा असतो. तो त्याला कधी कधी खाऊनही टाकतो–मेनन ह्यांच्या बाबतीत तसेच झाले आहेसे दिसते. देशाची सेवा ज्याला करायची त्याला ती वनवासातूनही करता येते. कारण ती स्फुरते हृदयात. मेननजींनी हट्ट धरला की, करीन सेवा तर मुंबईतूनच! त्यासाठी त्यांनी कॉंग्रेस सोडली आणि आपली खरीखुरी वस्त्रे व अस्त्रे धारण केली. मेनन तसे धूर्त. त्यामुळे त्यांनी अधिकृत 'लाल' टिळा लावला नाही. एकतर इथे 'लाल' रंगाची डाळ शिजत नाही हे त्यांना ठाऊक आहे. आणि दुसरे खुद्द चीनमध्येच जी 'फरपट' चालू आहे तिचाही बोध शहाणेसुरते भारतीय घेणारच ही खात्री ! म्हणून मेननजींनी "उभे राहू ना मी ?" असा सवाल करण्याचे नाटक केले. व 'लाल' भाईंनी 'हिरवा' दिवा दाखवला. पण मेननजींचे दैव कठोर झालेले दिसते. त्यांचा (व पंडितजींचाही) लाडका सेनापति आता पुढे सरसावला व त्यानेही 'द अनटोल्ड स्टोरी' नेमकी ह्याच वेळी सांगितली. आणि मेननजींच्या पाठीत खंजीर खुपसला. नेफा–पराभवाचे शिल्पकार नेहरू, मेनन, मोरारजी आहेत असे त्यांनी सांगून टाकले व लष्करी बाबतीत मेनन कसे हट्टी व दुराग्रही होते हे दाखवून दिले आहे. लेफ्ट. ज. बी. एम्. कौल ह्यांच्या ह्या पुस्तकाने सध्या धमाल उडवून दिली आहे. मेनन ह्यांनी 'मिग' विमाने लष्करी तज्ञांची मते डावलून कशी लादली ह्या संबंधीचा तपशील देताना कौल म्हणतात, "मिगविरोधी मत दर्शविणाऱ्या सेनाप्रमुखांना त्यांनी हिणवले व त्यांचा अपमान केला. रिअर ॲडमिरल दयाशंकर, एअरमार्शल इंजिनियर यांना उडवून लावताना मेनन म्हणाल्याचे ते लिहितातः

"Air Marshal, your name may be one, but you are not an engineer by profession and hence do not try and give opinions on technical matters". मेनन ह्यांना सर्व विषयातले अंतिम सत्य जणु गवसले आहे असा दावा करंजिया व त्यांचे सगेसोयरे करतात. विमानदल प्रमुख इंजिनियर हे 'नावाचे'च इंजिनियर आहेत हा 'शोध' एरव्ही मेननजींना कसा लागला असता? पण मेननजींची नेफा–पराभवातली जबाबदारी टाकणारे हे पुस्तक 'ऐनवेळी' पुढे आणण्यात कुणाचे काय राजकारण आहे हे न कळे. ते 'बोलके' आहे एवढेच आम्ही म्हणतो.

मेनन यांना कॉंग्रेसचे दोष एकदम दिसू लागले. मुंबई कॉंग्रेसने तिकीट दिले असते तर कॉंग्रेस शुद्ध, सात्विक, समाजवादी, श्रेष्ठ वगैरे वगैरे राहिली असती. आता ती खराब झाली आहे. आणि म्हणून तिच्यापासून देशाचे रक्षण व्हावे म्हणून हा 'कृष्णा'वतार उभा ठाकला आहे, असा दावा लाल भाई व करंजियाचे पिवळे मुखपत्र करीत आहेत. पण 'मुंबई' ने मेननजींना त्यांचे 'योग्य' स्थान दाखवले पाहिजे–तसे ती दाखवील हा आमचा विश्वास. तत्वनिष्ठ माणसे तत्वांसाठी जान गमावतात. ह्यांनी देशाची शान तर गमावलीच, आता तत्वाचा आव आणून वैयक्तिक "शान" कमावण्याचा प्रयत्न ते करीत आहेत. पण मेननजींचा रंग आता स्पष्ट झाला आहे. स्वार्थी व संधिसाधु मेनन यांना पराभूत करून मुंबईकर जनता हा चेंडू आता 'सीमापार' करणार आहे. व्यक्तीपेक्षा पक्ष मोठा आणि पक्षापेक्षा देश व देशहित मोठे हा 'मोठा' पाठ मेननजींसारख्या 'सर्वज्ञ' माणसाला पढविलाच पाहिजे, नाही का?

## रौप्य महोत्सव साजरे करणारे दादरचे बालमोहन विद्यामंदिर

दादर शिवाजी पार्कच्या नूतन आणि सुसंस्कृत अशा वसाहतीत आज एक आदर्श, नमुनेदार शिक्षणसंस्था साऱ्या साऱ्यांच्या कौतुकास आणि आदरास पात्र झालेली आहे. गेली पंचवीस वर्षे ही संस्था या विभागात शिक्षणप्रसाराचे कार्य करीत आहे. ता ३ जून १९४० रोजी ही संस्था शिवाजी पार्कच्या केळुस्कर रोडवरील चंपक निवासातील एका तळमजल्याच्या ब्लॉकमध्ये स्थापन झाली आणि आज १९६६ साली एका चार मजली टोलेजंग भव्य अशा स्वतःच्या इमारतीत मोठ्या अभिमानाने वावरत आहे. अल्पावधीत झपाट्याने प्रगति करणाऱ्या आणि थोरामोठ्यांचे गौरवास्पद अभिप्राय मिळविणाऱ्या अशा या शिक्षणसंस्थेचे नाव आहे "बालमोहन विद्यामंदिर."

ता. ३ जून १९४० रोजी बालमोहन विद्यामंदिर स्थापन झाले खरे परंतु शाळेतील वर्गाचे प्रत्यक्ष कामकाज व उद्घाटन ता. १६ जून १९४० रोजी महाराष्ट्रातील ख्यातनाम शिक्षणशास्त्रज्ञ कै. रामभाऊ परुळेकर यांचे शुभहस्ते झाले. त्यावर्षी शाळेत एकंदर ३७ विद्यार्थी होते आणि शाळेत पूर्व प्राथमिक ते इयत्ता चौथी पर्यंतचा विभाग होता. शाळा उघडल्यापासून अवघ्या वर्षभरातच विद्यार्थ्यांची झालेली प्रशंसनीय प्रगति पाहून कित्येक पालकांनी आणि तत्कालीन शिक्षणाधिकारी श्री. वि. द.

घाटे यानी शाळेत माध्यमिक विभाग उघडण्याची सूचना केली.

शाळेत भाषा, गणित, शास्त्र इ. निव्वळ बौद्धिक विषयांवरच भर न देता हस्त-व्यवसाय, सुतार काम, चित्रकला, गायन, शिवण, शारीरिक शिक्षण, बालवीर, ए. सी. सी., एन. सी. सी., आर. एस. पी. इ. विषयांचा व उपक्रमांचाही अभ्यासक्रमात पद्धतशीरपणे समावेश केलेला आहे.

शाळेतील वाचनालयात संदर्भ ग्रंथ, वाङमय, शास्त्र, शिक्षण, इ. ग्रंथ मिळून पन्नास हजारांवर पुस्तके आहेत. प्रत्येक विद्यार्थी वर्षाकाठी ३० ते ४० पुस्तके वाचू शकतो व त्यापासून मिळविलेल्या ज्ञानाचा फायदा तो निबंध स्पर्धा, वक्तृत्व स्पर्धा इ. चढाओढीत करतो. शाळेत सामुदायिक जीवनाच्या अभ्यासाला विशेष महत्व दिले जाते. छोटया-मोठया सर्व वर्गातून साध्या स्वच्छतेपासून तो स्वावलंबनापर्यंत मुलाना नागरिक जीवनाची दृष्टि मिळेल असे वातावरण तयार केले जाते.

अभ्यासात विशेष प्राविण्य दाखविणाऱ्या मुलाना अधिक प्रोत्साहन, उत्तेजन दिले जाते तसेच अभ्यासात मागे असलेल्या मुलांसाठीहि शाळा स्वखर्चाने शाळेच्या वेळाव्यतिरक्त खास वर्ग काढून त्यांची प्रगति घडवून आणते. थोडक्यात मुलांचा जास्तीत जास्त सर्वांगीण विकास शाळा घडवून आणते. सांस्कृतिक कार्यक्रम करण्यातही शाळा अग्रगण्य अशीच आहे.

शाळेच्या स्थापनेपासून तो आजपर्यंत सुपरिंटेंडेंट या नात्याने श्री. शि. द. उर्फ दादासाहेब रेगे हे काम पहात आहेत. संस्थेची स्थापना करण्यापूर्वी २० वर्षे त्यानी शिक्षक म्हणून कामाचा अनुभव मिळविला होता. त्यापैकी १७ वर्षे माटुंगा येथील डेव्हिड ससून रेफरमेटरी शाळेत त्यानी काम केले. तिथे विविध मुलांचे सूक्ष्म निरीक्षण करण्याची संधि त्याना मिळाली. तिथे त्यानी केलेले भिन्न भिन्न शैक्षणिक प्रयोग शिक्षणतज्ज्ञाकडून वाखाणले गेले. हे प्रयोग करीत असतानाच मुलांचे मानसिक आरोग्य राखून त्यांचा सर्वांगीण विकास साधणारी एखादी स्वतंत्र संस्था आपण चालवावी अशी जबरदस्त इच्छा त्याना झाली व त्यांच्या त्या इच्छेस श्री. रामभाऊ परुळेकर, श्री. सीतारामपंत तावडे यानी प्रोत्साहन, मार्गदर्शन नि संपूर्ण सहाय्य केले आणि अशा या स्फूर्तीतून ही 'बालमोहन विद्यामंदिर' संस्था स्थापन झाली आहे. या शिक्षण-संस्थेचा रौप्य-महोत्सव शिक्षणमंत्री ना. मधुकरराव चौधरी यांच्या अध्यक्षतेखाली नुकताच साजरा झाला ही मोठ्या भाग्याची गोष्ट आहे. संस्थेला यापुढेही असेच सुयश मिळो आणि संस्था दिवसेंदिवस अधिक वैभवसंपन्न होवो अशीच शुभेच्छा याप्रसंगी व्यक्त करतो.

—सारस्वत



**शीला (उषा राजे) आणि फुलवा ( नीळांबरी बर्वे ) 'नयन तुझे जादुगार'मध्ये.**

# असे पाहिले, असे ऐकले

## रंगल्या रात्री अशा

**नाटकेच** नाटके, नवी नाटके, जुनी नाटके, सामाजिक नाटके, पौराणिक नाटके, 'खुनी नाटके', चेटकीणीची नाटके, 'असुंदर' झालेली 'सुंदर' नाटके, नेपथ्यानेही न सावरलेल्या 'मधल्या भिंती'ची डबल नाटके, कणसे व दाणे नसलेली पण 'सूर्याखालचे' सर्व काही असलेली नाटके, परीस असूनही लोह न लागल्याने नुसतीच बैलाच्या गळ्यातली घंटा वाजवीत राहणारी नाटके, बुडत्या जावयाला खोलात नेणारी नाटके आणि उगीच 'पॉकेट मार' कंपनीत घेऊन जाणारी (तेवढाच चेंज म्हणून) नाटके—खूप खूप नाटके पाहिली. श्रेय शासनाला (आणि कल्पक हुमण्यांना) आणि हा रंगीबेरंगी मालमसाला जिद्दीने मुंबईपर्यंत आणून पोहोचविणाऱ्या 'कंपनी'ला (व परिक्षकांनाही). इंदूरपासून लातूरपर्यंत आणि कोल्हापूर-पासून नागपूरपर्यंत अवघ्या मराठी भाषिक जगाचे हे 'नाट्यदर्शन' मोठे 'अभिनव होते'. आनंद देणारे होते. इंदूरचा राजा 'मराठी' होता. राज्य मराठ्यांचे होते. मराठी साहित्याची मोठी उपासना तिथे चालते. पण राज्ये गेली, संस्थाने खालसा झाली, कला वाढत राहिल्या, भाषा वाढत राहिली. पण प्रांत वेगळा झाला होता. इंदूरच्या 'नाट्यभारती'ला महाराष्ट्र राज्य नाट्यस्पर्धेत भाग घेण्याचा 'तसा' नैतिक अधिकार काय? पण महाराष्ट्र शासनाने ही प्रांतीय 'मधली भिंत' काढून टाकली आणि गेली दोन वर्षे 'नाट्य-भारती' मुंबईच्या 'मराठी' प्रवाहात मिसळून गेली आहे. स्पर्धेचा सर्वात आवडलेला हा भाग बरं का! 'बेळगाव'चा लढा संपला नाही. पण अजून तरी बेळगाव म्हैसूरमध्येच आहे ना? इंदूरचाच नियम बेळगावला लागला. आणि वरेरकर नाट्य संघ मुंबईकराना भेटतो आहे. कलाजात प्रांत, भाषा बंधने मानीत नाही हेच खरे. शासनाने हे सिद्ध केले म्हणून सर्वाआधी अभिनंदन तयाचे!

सहाव्या महाराष्ट्र राज्य नाट्यमहोत्सवाच्या अंतिम नाट्य-स्पर्धा २५ डिसेंबर १९६६ ला सुरू झाल्या आणि तीन 'विश्रांति' घेऊन १२ जानेवारी १९६७ ला संपल्या. ह्या स्पर्धांसाठी नाटके आली ती रंगभवन, दादर केन्द्र, ठाणे, पुणे, कोल्हापूर, औरंगाबाद, अकोला व नागपूर ह्या केंद्रातून एकूण सोळा नाटके आली. त्यात "मधल्या भिंती" हे विजय तेंडुलकर यांचे नाटक दोन केंद्रातून आले. (उदय कला केंद्र, मुंबई व महाराष्ट्रीय कलोपासक, पुणे). तर एकूण दहा नवीन नाटके रंगमंचावर आली. सोळापैकी दहा नवीन! मराठी नाटकांच्या दृष्टीने "ए गुड परफॉर्मन्स!" अंतिम स्पर्धेत दहा आली. निरनिराळ्या केंद्रातून निदान दहा पंधरा नाटके नक्कीच आली असणार! एकूण वीस पंचवीस नवी नाटके—नवे नट—नवे दिग्दर्शक—नवे नेपथ्यकार—नवे समीक्षक मोठे चांगले दृश्य आहे नाही? मला तसे ते वाटते. कुठलाच पहिला प्रयत्न तसा परिपूर्ण नसतोच नसतो. पण अशा चार दोन अपुऱ्या प्रयत्नांतून मिळते दिशा—विकासाची! शोध लागतो नव्या नव्या कल्पनांचा. राज्य नाट्योत्सवात दहा नवीन नाटके आली. "लोह परिसा लागेना" (बाबा डिके, इंदूर), "सांपळा" (वसंत कामत, ठाणे). "इथे राह-णारी माणसे" (ना. ग. करमरकर, पुणे), "वर्तुळ" (शशिकांत यर-नाळकर, कोल्हापूर) "कांचनमृग" (रणजित देसाई, कोल्हापूर) "सागर माझा प्राण (सुरेश खरे, मुंबई) "बुडत्याचा पाय खोलात" (वा. रा. सोनार, नासिक) "कणसा कणसा दाणा दे" (भुसारी, नागपूर) "उंबरठ्यावरी माप ठेविले" (दत्ता पावसकर, मुंबई), "नयन तुझे जादुगार" (पुरुषोत्तम दारव्हे-कर, नागपूर) ही ती नाटके! ह्या दहाही नाटकांची प्रकृति भिन्न भिन्न होती. "सांपळा" हे रहस्यप्रधान होते, तर "लोह परिसा लागेना" हे नाटक काहीसे प्रचारात्मक होते. "नयन तुझे जादुगार" मध्ये चेटकिणीच्या मनाची वेदना शोधण्याचा (होय! शोधण्याचाच) प्रयत्न होता तर "इथे राहणारी माणसे" नाटकात झोपडपट्टीच्या माणसांचे 'पांढरपेशी' (भाषेतसुद्धा) चित्रण होते. "कांचनमृग" नाटकात लाचलुचपतीचा 'चालू' विषय (न संपणारा होता) तर "वर्तुळ" मधला संघर्ष कौटुंबिक होता. "कणसा कणसा"त मात्र 'दाणे'च नव्हते. "भुसारी यांचा भुस्सा" याने "सूर्याखालचे सर्व काही" अशी टीका सर्वत्र ऐकू येत होती. त्या-मानाने नवीन नाटकांबद्दल व नाटककारांबद्दल बरे व खरे बोलायचे झाले तर सागर माझा प्राण, कांचनमृग, नयन तुझे जादुगार, बुडत्याचा पाय खोलात ह्याबद्दलच म्हणता येईल. "सागर माझा

प्राण'', हे 'फॅनी' वरून व नयन तुझे जादुगार हे 'बेल बुक ॲन्ड कॅन्डल'-वरून घेतले असले तरी त्यातले नाटच लेखकानी समर्थपणे टिपले आहे असे वाटते. बुडत्याचा पाय खोलातचे सोनार अपेक्षा वाढवून गेले आहेत. ह्या स्पर्धेत ज्याला 'फार्स' म्हणून म्हणता येईल असे हे एकमेव नाटक ! त्या नाटकातल्या काही भूमिका सांकेतिक वाटल्या. (इतिहास संशोधक व बाजा) तरी एकूण नाटक 'सुखद' वाटले. 'कांचनमृग' ह्या नाटकाने रणजित देसाई ह्याजबद्दलच्या अपेक्षा वाढविल्या आहेत. 'तानसेन' नाटकाने 'सूर' मूक झाले होते. ह्या नाटकाने त्यांना नाटकाचा 'सूर' सांपडला आहे. त्यांची 'गायकी' (नाटकी) आता रंगेल असे वाटते. ह्या चार नाटकातले व्यक्तिरेखाटन मनोज्ञ वाटले. ''सागर माझा प्राण'' मधील अण्णा, बापू, माधव, रघू ह्या साऱ्याच व्यक्तिरेखा (त्यांच्या भाषेसहित) खरे यांनी चांगल्या रेखाटल्या आहेत. ''कांचनमृग'' नाटाकातला देवस्थळी हा कारकून ( प्रा. याळगी) असाच 'ठसा' उमटवून जातो. नानाही अविस्मरणीय. ''नयन तुझे जादुगार''मधील शीलाची वेदना हवी तेवढी उत्कृष्ट झाली नसली तली लक्षणीय व्यक्तिरेखा म्हणून ती लक्षात राहील. 'मधल्या भिंती' ह्या कलोपासकच्या नाटकाने यंदा फार निराशा केली. त्यातल्या त्यात लक्षात राहिले ते नाना (गोपीनाथ टिपणीस) प्रभा (माधव वझे) आणि सदा (अरविंद साने). नाटकाचा बदललेला शेवट रसिक मनाला आवडला नाही. नाटक फार 'संथ' गतीने झाले. उषा जोगानी 'आई'च्या भूमिकेला 'न्याय' दिला नाही. त्या फार कमी पडल्या. 'सांपळा' हे एकमेव रहस्यप्रधान नाटक ! सेट चांगला, प्रतिकात्मक, वातावरण गूढ, रम्य करणारा ! ह्या नाटकांचा आता 'फॉर्म्युला' होत चालला असला तरीही प्रेक्षकांना 'खिळवून' टाकण्याचे सामर्थ्य असल्या नाटकांत असते. प्रस्तुत नाटकात ते सामर्थ्य आहे. सौ. रिता सन्त (कु. कुंदा गुप्ते) अजित पारधी (सुधाकर कुलकर्णी) विश्वनाथ मानकामे (अशोक साठे) जानकी जगदाळे (पुष्पा जोशी) ह्या साऱ्या भूमिका चांगल्या झाल्या. प्रयोग निर्दोष झाला. (अगदी पाठांतरसुद्धा) ''लोह परिसा लागेना'' ह्या नाटयभारतीने सादर केलेल्या प्रयोगात लेखक–दिग्दर्शक बाबा डिके, वसंत रेगे (मास्तर) सुमन धर्माधिकारी (उर्मिला), निर्मला दाणी (राधा) यांचा खास उल्लेख करायला हवा. 'प्रचारकी' नाटकाचे शेवटी जे होते तेच ह्या नाटकाचे झाले. धड ते प्रचारकीही झाले नाही आणि धड कलात्मक उंचीही गाठू शकले नाही. त्यामानाने 'कारकून' नाटक उजवे होते असेच म्हणता येईल. कणसा कणसा दाणा दे ही एक अशीच शोकांतिका (नाटक सुखान्त असूनही झालेली) हे नाटकही धड कुटुंबाचे राहिले नाही, धड प्रचारकीही राहिले नाही. ''कुठला प्रश्न राहिला हो ?'' असा प्रश्न प्रेक्षक एकमेकांना विचारीत होते. 'वर्तुळ' नाटकाची समस्या खरी चांगली होती पण ते नाटक त्याच त्या संवादांच्या वर्तुळात फिरत राहिले. नाटककाराची कल्पकता प्रसंग निर्मितीबाबत फारच थिटी पडली. त्या नाटकात कुमार गुप्ते (बाळ दैनी) सौ. अमिता गुप्ते (सुलभा राशिवडेकर) गफूर (सुरेश पेंढारकर) ह्यांची कामे उल्लेखनीय म्हणता येतील. **अपराध मीच केला** हे राजहंस कला मंडळ (कुर्ला) ह्या संस्थेने सादर केलेले नाटक धंदेवाईक रंगमंचावर सादर होत असल्याने तुलना अपरिहार्य ठरली. पण तुलनेत ते नाटक कमी पडले नाही. उलट तोलामोलाचे झाले. अपेक्षा वाढविणारे झाले. कमांडर अशोक वर्टी (नरेन् चव्हाण) शैलजा वर्टी (पुष्पा बिळगी) श्याम अजिक्य (प्रभाकर पत्की) संजय (कुमार सुरेंद्र) ह्यांच्या भूमिकांचा खास उल्लेख करावा लागेल. ह्यातली काही माणसे व्यावसायिक रंगभूमीवर कामे करतात म्हणून ह्या नाटकाला स्पर्धेत स्थान नसावे म्हणून 'इंटरेस्टेड पार्टीज्'ची ओरड कानी आली. ती वेशीवर टांगतो झालं. परीक्षक, संचालकांनी बघून घ्यावे.

ह्या स्पर्धेत अनेक चांगल्या गोष्टी गवसल्या. नाटककार गवसले (सुरेश खरे, रणजित देसाई, वा. रा. सोनार, वसंत कामत, ना. ग. करमरकर) दारव्हेकरांचा भाव वधारला. (लेखक–दिग्दर्शक म्हणून) विशेषतः दिग्दर्शक म्हणून दारव्हेकर किती समर्थ आहेत ह्याचा प्रत्यय शेवटच्या दिवशी आला. तेवढचा टाळचा त्याआधी कुणालाच मिळाल्या नाहीत. ही पावती सरकारी शिक्कामोर्तब घेऊन द्वारव्हेकर यंदा नागपूरला घेऊन जाणार असं दिसतं बरं का ! दिग्दर्शक म्हणून बाबा डिके, सेंजित, राजा नातू, बाळ दैनी, शिरवईकर, वसंत पेठे, अशोक साठे ह्यांचा खास उल्लेख करायला हवा. ह्या निमित्ताने एक लिहून टाकतो. स्पर्धेसाठी आलेल्या 'कच्च्या' नाटकावर लेखक–दिग्दर्शकानी संस्कार केले तर काही नाटके रंगतीलही (इथे राहणारी माणसे, वर्तुळ, लोह परिसा) येग येग विठाबाई, सुंदर मी होणार, दूरचे दिवे ही नाटके फार निराशा करून गेली. त्यामुळे त्यातल्या चांगल्या मंडळीनाही अन्याय झाला. ह्या मंडळीतली बरीचशी मंडळी शेवटच्या दिवसापर्यंत येथे थांबली. मंडळी असं थांबत जा. पहात जा. पहाता पहाता आपण नेमके कुठे आहोत ते समजून घेता येतं. नाहीतर वासरातच केवळ लंगडी गाय



**मित्रसहयोग, ठाणे ह्या संस्थेच्या 'सांपळा' नाटकात कु. कुंदा गुप्ते, सुधाकर कुलकर्णी आणि दिग्दर्शक–नट अशोक साठे.**







शहाणी ठरायची. सारेच नट आणि नटवर्य ठरायचे! शिकायचं काय आणि कुणाकडे? नटाने नाटक पहात राहिलं पाहिजे. कवीने कविता वाचीत राह्यलं पाहिजे. गायकाने गाणं ऐकत राह्यलं पाहिजे—काय? पटतंय् काय बघा. 'संगीत नाटकाचे वक्षीस वाया जाणार' असे वाटत होते. पण गोपाळ कौशिक व नीलांबरी बर्वे (प्रसाद व फुलवा—नयन तुझे जादुगार) यांनी शेवटच्या दिवशी 'मजा' आणली. त्यांना वेळेअभावी संपूर्ण वाव मिळाला नव्हता नाहीतर————दारव्हेकर हा एक कर्तबगार दिग्दर्शक—निर्माता आहे हेच खरे!! काय तुफान गर्दी होती हो शेवटच्या दिवशी! कितीतरी सोयी—गैरसोयी अन् भांडणे (काही गोडही)—पेल्यातली! पण एकूण नाटकावर लोक खूष!! परीक्षक होते गजानन जहागिरदार, सखारामपंत जोशी, शां. शं. रेगे, वा. य. गाडगीळ आणि सौ. मंगला संझगिरी.

ह्या सोळा नाटकांच्या सोळा रंगल्या रात्रींची स्मृति खूप दिवस पुरेल मुंबईकर मंडळींना! शासनाचे अभिनंदन!!

**--बन्याबापू**

---

### ( पृष्ठ ५९ वरून—दिवाळी अंकातील कथा )

ह्यांनी एक कौटुंबिक कहाणीच सांगितली असली तरी व्यक्तिव्यक्तींत निर्माण होणारी नाती, त्यांचा गुणाकार व गुंता व अखेर आयुष्याचे न सुटणारे गणित ह्याचे हृदयस्पर्शी चित्रण त्या कुटुंबातील एका स्त्रीच्या कहाणीतून घडविले आहे. 'तिसरा डोळा' ह्या कादंबरीत रस्त्यावरील पोरांचे जीवन आले आहे. 'वासूनाक्या'च्या गाजावाजामुळे केवळ एक ट्रम म्हणून ते ह्या कादंबरीत आलेले वाटत नाही. रगेलपणापेक्षा पोखरून गेलेल्या त्यांच्या शरीराचे आणि दुबळ्या मनाचे करुण चित्रच येथे मनावर बिंबते. वयाची तिशीहि न ओलांडलेल्या जीवांची दुर्दशा काळजाला भिडणारी आहे. भांडणे, मारामाऱ्या, मैत्री, भोग, फसवणूक, मृत्यु, शोक, ह्या सगळ्याच अनुभवांना एक वेगळा अर्थ ह्या जगात येतो. ही कादंबरी संपूर्ण यशस्वी म्हणता येणार नाही. काही वर्णने, त्यातील तपशील उपरा आहे. कोठे निवेदनात कोरडेपणा तर कोठे भावविवशता आहे. अधून मधून पांढरपेशा भावनांची छाप त्या चित्रणात सहज लक्षात येते. पण ह्या सगळ्या उणीवांसकट ही कादंबरी उल्लेखनीय आहे. मिसाळ ह्यांची 'अक्षरा' ही एक छोटीशी भावकथा थोडीफार पु. शि. रेग्यांच्या लेखन-तंत्र पद्धतीने लिहिलेली आहे. आपण पुनर्विवाह केला तर मुलाचे हाल होतील, ह्या भावनेने पुनर्विवाह न करणारा सालस मनाचा पिता, परंतु चुकून त्याचा ज्या मुलीशी संबंध येतो तीच त्याच्या लाडक्या मुलाच्या आयुष्यात प्रेयसी म्हणून येणे, त्यामुळे त्याने त्यांच्या प्रेमाला केलेला विरोध, तिच्या शीलासंबंधी तरुणाच्या मनात निर्माण झालेल्या कुशंका, अखेर पित्याचा मृत्यु, तिचा मृत्यु व तिच्या प्रेमाच्या जाणिवेने होरपळलेला नायक, अशी ही एक भावकथा आहे. घटनाप्रधान पद्धतीचा अवलंब करता, काव्य, मनात तरंगलेले विचार, आठवणी, हळुवार संवाद, प्रसंग अस्फुट स्वगते, वेदना ह्यातून कोमल व्यथांना पालवी फुटते....ह्या दृष्टीने शैलीची मांडणीहि लेखकाने वेगळी केली आहे. ही देखील संपूर्ण यशस्वी कादंबरी म्हणतां येणार नाही. सहजता आणि कृत्रिमता ह्यांचे चमत्कारिक मिश्रण कांही ठिकाणी सहज लक्षात यावे इतके उघड आहे. तरीपण एक वेगळा प्रयत्न म्हणून ह्या कादंबरीचा उल्लेख केला पाहिजे.

ह्या खेरीज नवे जुने परिचित—अपरिचित अशा अनेक लेखकांकडून कादंबऱ्यांचे लेखन झाले आहे. ह्या सगळ्या कादंबऱ्यांचा साकल्याने विचार केला की एका बाजूला त्यातील वैचित्र्य नजरेत भरते. आतापर्यंत उल्लेखिलेल्या कादंबऱ्यांच्या जोडीला श्रीपाद काळे ह्यांची 'परिवर्तन' रा. वि. मंत्रि ह्यांची 'आवर्त' नामदेव व्हटकर ह्यांची 'सोळा शिणगार', सौ. शकुंतला गोगटे ह्यांची 'चंदनाची उटी', इक्बाल हसरत ह्यांची 'अढळा पेटली', सौ. शैलजा राजे ह्यांची 'अष्टभुजेच्या कन्या' व 'दोलन' सांबारे ह्यांची 'अश्रु दाटले लोचनी', वसंत देशमुख ह्यांची 'इयेचि जन्मली वेदना', चंद्रकांत काकोडकरांच्या सगळ्याच कादंबऱ्या ह्या सगळ्या लक्षात घेतल्या की हे वैचित्र्य किती प्रकारचे आहे, ह्याची सहज कल्पना येईल. (ह्यापैकीं कांही कादंबऱ्यांचे केवळ पूर्वार्ध किंवा कांही भाग प्रसिद्ध झाले आहेत.) ह्यातील काही वैचित्र्य लेखकांना जाणवलेल्या विशिष्ट अनुभवांमुळे असेल, पण साकल्याने विचार करता ते आंतरिक गरजेतून निर्माण होण्याऐवजी वाचकांच्या गरजा लक्षात घेऊन आलेले आहे, हे लक्षात यावयास वेळ लागत नाही. इतर कोणत्याहि वाङमयप्रकारापेक्षा वाचकांच्या उड्या कादंबरीवर अधिक पडतात. कारण त्याना ठसठशीत, अनेक घडामोडीनी भरलेले संपूर्ण जीवनाचे चित्र हवे असते. म्हणूनच केवळ कादंबऱ्या असणारे दिवाळी अंकही प्रसिद्ध होतात. वाचकांची ही भूक लक्षात घेऊन त्यांच्या अभिरुचीवर चांगले कलात्मक संस्कार होतील हा विचार होण्यापेक्षा, 'संपूर्ण शृंगारिक, सामाजिक कादंबरी', 'रहस्यपूर्ण मस्तवाल कादंबरी', अशा सारख्या वारेमाप विशेषणांच्या जाहिरातीतूनच त्यांच्या अभिरुचीला सवंग वळण लावण्यात येते. ते कमी कष्टाचेहि असते. सगळेच लिखाण ह्या सवंग पद्धतीने होते, असा दावा नाही. परंतु कुठे तरी हे आव्हान कलावंत ह्या नात्याने स्वीकारण्याऐवजी टाळले जाते व म्हणून अनेक वैचित्र्यपूर्ण अनुभवाना ओझरते स्पर्श करूनहि अखेर संकलित परिणाम उरतो, तो एक तऱ्हेच्या ठराविकतेचा—सांकेतिकतेचा.

कला आणि रंजन ह्या दोहोमधे आजच्या युगातील साहित्यात जो वाढता विरोध निर्माण झाला आहे, त्याचाहि एक परिणाम सर्व सामान्य कादंबरी—लेखनावर दिसून येतो. रंजनाची जबाबदारी अखेर कलात्मक जाणीवेला गौण स्थान देणाऱ्या लेखकांवर येऊन पडते.

परंतु हे कांहीहि असले तरी कादंबरीचा वाचकवर्ग नेहमीच संख्येने मोठा असणार व कादंबऱ्यांची निर्मितीहि उदंड होत राहणार ह्यात शंका नाही.

**[ दिवाळी अंकातील एकांकिका पुढील अंकी ]**






REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment FEBRUARY 1967

DIPAVALI MONTHLY



COVER PRINTED AT ASHA PRINTERY, BOMBAY-4.